






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

२९४७

अं. १२९ . १३० . १३१ . १३२

संपादक - वा. रा. ढवळे

वर्ष ३३ अंक १२९ एप्रिल - मे - जून १९५९
वर्ष ३३ अंक १३० जुलै - ऑगस्ट - सप्टेंबर १९५९
वर्ष ३३ अंक १३१ ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर १९५९
वर्ष ३३ अंक १३२ जानेवारी - फेब्रुवारी - मार्च १९६०





महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३१ आक्टोबर–नोव्हेंबर–डिसेंबर १९५९

## या अंकांत



( संपादकीयांत व्यक्त केलेलीं मतें संपादकांचीं वैयक्तिक समजावीं. )

संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

# साभार-स्वीकार

१ **मराठी व्याकरण**—मोरेश्वर सखाराम मोने; चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; रु.४=५०.

२ **लाडकी लेक** ( नाटक )— म. भा. भोसले; ग्रामीण प्रकाशन, धनगांव (द. सातारा). २ रु.

३ **अहेव लेणं** ( कथा द्वि. आ. )— म. भा. भोसले; ग्रामीण प्रकाशन, धनगांव ( द. सातारा ) रु. २=५०.

४ **आकाशपुष्प** ( कविता )- सी. म. बापट; समर्थ प्रकाशन, बेळगांव; रु. २=५०.

५ **स्वातीचा मेघ** ( कविता )- सी. म. बापट; नागपूर; रु. २=५०.

६ **काळ बदलतो आहे** (कादं.)—कृ.शं. कुलकर्णी; महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४;३ रु.

७ **माझे समकालीन**—न. वि. गाडगीळ; व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; ४ रु.

८ **प्राचीन भारतीय कला इतिहास आणि रूपदर्शन** (भाग१ला)—रा.शं.वाळिंबे; मे. जोशी लोखंडे प्रकाशन; टिळक रस्ता, पुणें २; ६ रु.

९ **ऊरुभंग आणि इतर नाटकें.**

१० **सिंहाचा मुखवटा** (कादं. अनुवाद)- उमाकांत ठोमरे; विदर्भ महारोगी सेवामंडळ, अमरावती; ५ रु.

११ **कानफाट्या**— उमाकांत ठोमरे; महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; ३ रु.

१२ **श्रीदेवी महात्म्यसार** ( प्राकृत सप्तशती )– दे. ल. महाजन; चिटणीस, महाजन साहित्य प्रकाशन मंडळ, होळी, नांदेड; ७ रु.

१३ **श्री स्वामी शिवानंद**— भगवान राघवेंद्र नाईक; महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; २ रु.

१४ **गोमंतकीय देवालयें**— ना. भा. नायक, रिवण ( गोवा ); रु. ३=५०.

१५ **धृपद** ( कविता )—विंदा करंदीकर; पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; ५ रु.

१६ **ज्ञानेश्वरींतील शिकवण**— श्री. मा. कुलकर्णी; उन्मेष प्रकाशन, नागपूर २; १ रु.

१७ **शालेय रंगभूमि**—चंद्रकुमार डांगे; मे. जोशी लोखंडे प्रकाशन, पुणें २; रु. ३.

१८ **पुरुषोत्तम** ( नाटक )—मो.स. साठे; इरावती ट्रेडर्स, ७५४ शुक्रवार, पुणें २; २ रु.

**कॉंटिनेन्टल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २ यांची प्रकाशनें :—**

१९ **पानदान**—वसंत सबनीस; रु. २=५०

२० **आश्विनाचं उन**—पद्माकर डावरे; रु. ३.

२१ **राजविद्या** – पु. ग. सहस्रबुद्धे; रु. ३=५०.

२२ **नग्नदेवता**— ले. हॉवर्ड फास्ट ( अनु. माधव लिमये ); २ रु.

**मौज प्रकाशन, खटाववाडी, गिरगांव मुंबई ४ यांची प्रकाशनें :—**

२३ **डॉ. केतकर** – द. न. गोखले; रु. १२=५०.

२४ **प्राचीन गीत भांडार**—( संपादक ), ना. ग. जोशी; रु. १०.

२५ **जोगवा** ( कविता )— आरती प्रभु; रु. ३=५०.

२६ **साता समुद्रापलीकडे** – गंगाधर गाडगीळ, रु. ४=५०.

२७ **हॅम्लेट**— ( अनु. )—नाना जोग.

२८ **कल्प फुलें**—प्रातिनिधिक कवितांचा संग्रह ( संपादक ), श्री. भा. ल. रानडे; सांगली २ रु.

२९ **विचार लहरी** – ( वैचारिक व प्रासंगिक अशा २८ लेखांचा संग्रह. ) लेखक : श्री. श्री. रा. देव; देवनिवास धाराशिव ( जि० उस्मानाबाद ) देवकन्या पुष्प ४ थें : मूल्य २ रु.

३० **प्रतिज्ञापूर्ति**—खंडकाव्य : देवकन्या पुष्प ३ रें कवि : श्री. रा. देव, मूल्य १। रु.

३१ **काव्यमय चरित्र**— ( श्री. संत भटजी बापू ऊर्फ श्री. बाळकृष्णानंद स्वामी यांचें ) लेखक : श्री. रा. देव. देवकन्या पुष्प २ रें मूल्य ७५ नये पैसे.

---

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

महाराष्ट्र
साहित्य
पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३१ ऑक्टोबर–नोव्हेंबर–डिसेंबर १९५९

# संपादकीय

**नवलेखनांताल अनिष्ट प्रवृत्ति : दोन भाषणें**

नवलेखनांतील अनिष्ट प्रवृत्तींवर कडाडून हल्ला करणारीं दोन भाषणें डिसेंबर महिन्यांत झालीं. वस्तुनिष्ठ टीका व निर्भीड स्पष्टवक्तेपणा हीं त्या भाषणांचीं उल्लेखनीय वैशिष्ट्यें म्हणून सांगतां येतील. पहिलें भाषण बडोदें येथील मराठी वाङ्मयपरिषदेच्या २३ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष या नात्यानें सुप्रसिद्ध कवि व पटकथालेखक श्री. ग. दि. माडगूळकर यांनी केलें होतें. त्यांच्या मतानें गेल्या दहा-बारा वर्षांत मराठीची भूमि म्हणावी तशी पिकलीच नाही. किंबहुना मराठीच्या भूमींत केवळ गवतच पिकतें की काय अशी भीति त्यांना लागून राहिली आहे. नवसाहित्यांत कांही चांगलें असेल तर त्यानेंहि भारून जाण्याइतकी रसिकता व स्वागतशीलता माडगूळकरांच्या ठिकाणीं असूनहि आजच्या नवसाहित्यांत 'रत्नत्व' अभावानेंच तळपत आहे अशी त्यांची तक्रार आहे. इतकेंच नव्हे तर "आजचें वाङ्मय वैफल्याचीं वांझोटीं गाणीं गाणारें, अनीतीच्या कथा अट्टाहासानें ऐकवणारें आणि अर्धबोबडी अभिव्यक्ति अट्टाहासानें लादणारें मराठीचें मायेफिरू पोर आहे" असा त्यांचा आजच्या एकंदर वाङ्मयावर अभिप्राय आहे.

नवकवि व त्यांची कविता यांवरहि त्यांनी कडाडून हल्ला केला आहे. "कांही सन्मान्य अपवाद सोडले तर 'आप लिखे और खुदा बाचे' या जातीचेंच आजचें सारें कवित्व आहे" असें त्यांना वाटतें. इतकेंच नव्हे तर, या नवकवींनी गद्याला पद्याच्या घरांत घातलें आहे हें त्यांचें कर्तृत्व होय असें ते उपहासानें बोलत आहेत. नवकाव्याचे पाठीराखे टीकाकारहि त्यांच्या आघातांतून सुटलेले नाहीत.

नवकाव्य अगर नवकथा यांच्यासंबंधी श्री. माडगूळकर हे जेव्हा विचार करतात त्या वेळीं तीं दोन्ही मराठी भाषेच्या रसाळ व प्रासादिक परंपरेपासून अगदी निराळीं आहेत

याची त्यांना जाणीव होते व म्हणूनच अशा प्रकारचें लिखाण त्यांना आकर्षित करूं शकत नाही. थोड्या निराळ्या भाषेंत लिहावयाचें म्हणजे कविता आणि कथा यांच्या रसग्रहणाच्या मार्गांत अभिजात वाङ्मयाच्या स्वरूपासंबंधीचे त्यांचे पूर्वग्रह आड येतात. ज्या वाङ्मयांत वैफल्याच्या भावनेचा आविष्कार आहे अगर अनीतीच्या कथांचा भरणा आहे तें उच्च वाङ्मय नव्हे अशी त्यांची सुटसुटीत व्याख्या आहे. या व्याख्येचा निकष लावून आजच्या वाङ्मयाची तपासणी केल्यामुळे माडगूळकरांना गेल्या दहा-बारा वर्षांत मराठीची भूमि पिकलीच नाही असें वाटावें हें साहजिकच आहे. पण प्रश्न आहे तो की,हा निकष बरोबर आहे काय? वाङ्मयाची महनीयता त्यांतील विफलतेवर अगर सफलतेवर किंबहुना त्यांतील आशावादावर अवलंबून असते काय ? नीति-अनीति या कल्पना सापेक्ष नाहीत काय ? काव्याची लोकप्रियता त्यांतील ' सुभाषिता 'वर अवलंबून असते असें ते म्हणतात, पण लोकप्रियता व 'सुभाषितता' हीं उत्कृष्ट काव्याचीं एकमेव लक्षणें होऊं शकतील काय ? उत्कृष्ट काव्य ठरविण्याचे ते मानदंड होऊं शकतील काय ? आजच्या नवलेखनाबद्दल जें मतप्रदर्शन श्री. माडगूळकरांनी केलें आहे ती त्यांची व्यक्तिश: प्रक्रिया आहे. तें त्यांचें प्रामाणिक मत असेल हें मान्य; पण वाङ्मयाची महनीयता अगर त्याचा निकृष्टपणा ठरविण्यासाठी वरील प्रश्नांची साधार चर्चा होणें अत्यावश्यक असते. नवें कांही तरी यायला हवें हें माडगूळकरांना मान्य आहे. पण हें नवें जुन्यांतून यायला हवें अशी त्यांची अपेक्षा आहे. हें नवें येईल तेव्हा दिमाखाने येईल, प्रकाशासारखें येईल असें ते मोघमपणाने, काव्याच्या भाषेंत बोलतात. त्या नव्याचें निश्चित स्वरूप आकलन करावयास कवीच्या प्रतिभेची झेप येथे अपुरी पडते. मात्र नव कवितेवरील त्यांचा दुर्बोधतेचा आरोप सर्वसंमत होण्यासारखा आहे.

नवकथाकार व नवकवि यांनी खेड्यांतील विविध जीवन पहावें व ग्रामजनांच्या दु:खाशीं समरस व्हावें अशा स्वरूपाचें माडगूळकरांनी त्यांना मार्गदर्शन केलें आहे. जें नवें यायचें आहे तें या पद्धतीने येईल असा भोळा विश्वास त्यांना वाटत असावा. स्वत: कवि व कथाकार असूनहि असल्या संदेशांनी वाङ्मय–निर्मिति होण्याचा संभव नाही हें त्यांच्या लक्षांत कसें आलें नाही याचें आश्चर्य वाटतें.

## दुर्बोधतेची मीमांसा

दुसरें भाषण प्रा. रा. श्री. जोग यांनी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ६१ व्या वार्षिकोत्सवप्रसंगीं अध्यक्ष या नात्याने केलें होतें. त्यांच्या भाषणाचा विषय ' मुख्यार्थाची कैफियत अथवा दुर्बोधतेची मीमांसा ' हा होता. विषयावरून त्यांची टीका कवितेपुरतीच मर्यादित होती हें स्पष्ट होतें. प्रा. जोग हे जुन्या-नव्या कवितेकडे सारख्याच सहानुभूतीने नि स्वागतशील वृत्तीने पाहणारे एक साक्षेपी व चिन्तनशील टीकाकार आहेत. नवकवितेची टर उडवावी अगर वेळीं-अवेळीं तिला झोडपावें अशी त्यांची इतर कांही टीकाकारांसारखी वृत्ति नाही. त्यांच्यासारख्या संस्कृत व मराठी या दोन्ही भाषांचा सखोल अभ्यास असणाऱ्या टीकाकाराला नवीन कविता समजावून घेतांना अगर समजावून देतांना ज्या अडचणी आल्या अगर येतात त्यांचीच मीमांसा त्यांनी प्रस्तुत भाषणांत केली आहे. आजची कविता ही कोडेवजा, अबोध व चमत्कृतिपूर्ण झालेली असून त्यापासून मिळणारा आनंद हा चमत्कृतीचा आहे की रसास्वादाचा आहे हें निश्चित करण्यावरच तिचें मोठेपण ठरणार आहे. आजच्या कवितेंतील प्रतिमानें हीं मुख्य आशयाची शोभा वृद्धिंगत करण्याऐवजी त्यांच्या चमत्कृतीखाली बिचारा आशय अवघडल्यासारखा वावरत असतो याचा प्रत्यय

प्रातिनिधिक कवींच्या कांही कविता वाचतांना येतो. ही स्थिति काळाच्या दृष्टीने कशी स्पृहणीय नाही याचीच चर्चा जोगांनी विस्ताराने नि सप्रमाण केली आहे. प्रातिनिधिक कवींची ही स्थिति मग त्यांचें अनुकरण करून कविता शक्य तितकी अबोध करण्याचा बुद्ध्या प्रयत्न करणाऱ्या अलीकडच्या सटरफटर कवींच्या कवितांची कशी स्थिति असेल याची कल्पनाच केलेली बरी. या सर्व कवींच्या काव्यांतील दुर्बोधता, पोचटपणा व त्यांतील अकाव्यात्मता कोणीतरी जबाबदार टीकाकाराने स्पष्टपणाने सांगण्याची आवश्यकता होती. हें आवश्यक कार्य निर्भीड, स्पष्टपणाने व बिनतोड आधाराने प्रा. जोग यांनी केलें आहे याबद्दल ते अभिनन्दनास पात्र आहेत.

प्रा. जोग यांच्यासारख्या मराठी व संस्कृत या दोन्ही भाषांचें व साहित्यशास्त्राचें अध्यापन करणाऱ्या सहृदय रसिकाला सुद्धा जिथे नवीन कविता आकलन होण्यास प्रयास पडतात, किंबहुना प्रयास करूनहि तिच्यांतील मुख्यार्थ आकलन होऊं शकत नाही, तिथे मराठीच्या सामान्य वाचकाला नवकाव्य वाचतांना किती गुदमरून गेल्यासारखें होत असेल याची कल्पनाच केलेली बरी. नवकाव्यांतील ही दुर्बोधता रसिकाला बोचते असें नसून शब्दार्थांच्या चमत्कृतींत काव्य आहे ही जी नवीन कवींची समजूत झाली आहे व त्या समजुतीप्रमाणे ते जी कूटवजा कविता करीत आहेत ती प्रथाहि खऱ्या काव्याला मारक आहे असेंहि त्याला वाटतें; आणि नवकवितेंतील हे दोन्हीहि दोष नाहींसे व्हावेत व नवकवितेला बहर यावा याच हेतूने प्रा. जोगांनी आणि माडगूळकरांनी दोषदिग्दर्शन केलें व कोणीहि रसिक त्याच हेतूने नवकवितेवर आक्षेप घेत राहील.

## म. सा. प. च्या शुद्धलेखनाला मान्यता

मराठी साहित्य परिषदेने इ. स. १९३० सालीं मराठी शुद्धलेखनाचे नवीन नियम तयार केले. त्या नियमांचा कांही नियतकालिकें, विद्यापीठें वगैरेंनी स्वीकार केला होता. म.सा.प. च्या परीक्षांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना याच नियमांचा अभ्यास करावा लागत होता हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाही. पण सरकारी शाळाखातें व माध्यमिक शालान्त बोर्ड यांनी या नियमांचा अंगीकार न केल्यामुळे शुद्धलेखनांतील अराजक नष्ट होण्यास परिणामकारक असा मार्ग बंद झाला होता. गेल्या दोन-तीन वर्षांत या शुद्धलेखन-नियमांचा तज्ज्ञांच्या सभेंत फेरविचार झाला व कांही दुरुस्त्याहि सुचविण्यांत आल्या. अखेर एकच दुरुस्ती सर्वसंमत होऊन तिच्यासह इ. स. १९३० चे नियमच कायम झाले व म. सा. प. च्या वार्षिक साधारण सभेने त्यांना मान्यताहि दिली. हे संमत झालेले शुद्धलेखनाचे नियम सरकार व बोर्ड यांच्याकडे स्वीकारासाठी पाठविण्यांत आले व त्यांनी ते आता स्वीकारल्याचें कळविलें आहे. हा महत्त्वाचा निर्णय घेण्याची समयज्ञता दाखविल्याबद्दल मी मुंबई सरकार व माध्यमिक शालान्त बोर्ड यांचें अभिनंदन करतों.

इ. स. १९६०-६१ च्या शालेय वर्षापासून हे नवीन नियम अमलांत येत असल्यामुळे मराठीच्या सर्व अभ्यासकांनी, लेखकांनी, विद्यापीठांनी, शिक्षणसंस्थांनी व प्रामुख्याने वृत्तपत्रें व नियतकालिकें यांनी या नियमांचा कटाक्षाने अवलंब करून शुद्धलेखनांतील अराजक घालवून त्या लेखनांत सुसूत्रता आणावी अशी विनंती केल्यास तिचा अव्हेर होणार नाही अशी आशा आहे. या शुद्धलेखनाचा प्रत्यक्ष अवलंब करतांना कांही नवीन दुरुस्त्या सुचण्याची शक्यता आहे. त्या सुचविल्या गेल्यास साहित्य परिषद् त्यांचा जरूर विचार करील.

## एकसष्टीनिमित्त अभीष्टचिंतन

मराठींतील सुप्रसिद्ध कादंबरीकार व पत्रकार सर्वश्री. पु. य. देशपांडे व ग. त्र्यं. माडखोलकर यांना अनुक्रमे ११नोव्हेंबर१९५९ व २८ डिसेंबर१९५९ रोजी वयाचीं ६०वर्षे पुरीं होऊन ६१ वें वर्ष लागलें यावद्दल मी त्या दोघांचेंहि मनापासून अभिनंदन करतों. या दोनहि साहित्यिकांची वाङ्मयीन व वृत्तपत्रीय कामगिरी सर्व मराठी वाचकांना निदान 'पत्रिके'च्या वाचकांना चांगलीच परिचयाची आहे. यापैकी निदान श्री. माडखोलकर यांनी 'तरुण भारत' या दैनिकाच्या रूपाने वृत्तपत्रसृष्टींत जें स्पृहणीय यश संपादन केलें आहे. त्याची जाणीव सर्व सामान्य वाचकालाहि आहे. अवघ्या १०।१२ वर्षांत 'तरुण भारता'ला जें वृत्तपत्रसृष्टींत तिनीचें नि अत्यन्त मानाचें स्थान आज प्राप्त झालें आहे त्याचें श्रेय जितकें श्री. माडखोलकरांच्या व त्यांच्या सहकाऱ्यांच्या संपादन कौशल्याला आहे तितकेंच तें खुद्द माडखोलकरांच्या परिणतप्रज्ञ लेखणींतून प्रसवलेल्या अग्रलेखांना आहे हें मान्यच करावें लागेल. 'तरुण भारता' इतके राजकीय व वाङ्मयविषयक माहितीनें व सुललित व विचारपरिप्लुत लेखनशैलीने सुसज्ज असलेले अग्रलेख इतर वृत्तपत्रांत क्वचितच आढळून येतात. पु. य. देशपांडे यांचें कादंबरीलेखन जवळजवळ स्थगितच झाल्यासारखें असून त्यांची वृत्ति आतां आध्यात्मिक विचारसरणींत मग्न होऊन राहिली आहे. उलट श्री. माडखोलकरांची लेखणी राजकारणाप्रमाणेच साहित्याच्या सर्वच शाखांत अद्यापि प्रभावी प्रतिभाविलास करीत आहे हें विशेष होय. या दोनहि साहित्यिकांची साठी आता उलटली असली तरी मनाने हे दोघेहि तरुणच आहेत. या दोघांच्या हातून मराठी वाङ्मयांत अद्याप आणखी भर पडावयाची असल्यामुळे त्यांच्या अभिनंदनाबरोबरच त्यांना मी सुदीर्घ आयुरारोग्य चिंतितों.

## कालाने केलेलें हत्याकांड !

कै. प्रा. माधवराव अळतेकर यांच्या निधनाचें दुःख ओसरतें न ओसरतें तोंच अळतेकर घराण्यांतील दोन कर्त्या पुरुषांच्या अकाली निधनाचें वृत्त वाचकांच्या कानांवर घालण्याचा प्रसंग यावा यापरतें दुसरें दुर्दैव कोणतें असणार ? मराठी चित्रपटसृष्टि व नाट्यसृष्टि यांच्याशीं समरस झालेले सुप्रसिद्ध दिग्दर्शक श्री. पार्श्वनाथ अळतेकर हे ता. २२नोव्हेंबर रोजी कोल्हापूर मुक्कामीं दिवंगत झाले व त्या योगाने चित्रपटसृष्टि व नाट्यसृष्टि या क्षेत्रांतील एका ध्येयवादी नटाला व दिग्दर्शकाला महाराष्ट्र मुकला आहे. त्यांनी केलेलें कै. केशवसुतांच्या कवितांचें प्रभावी वाचन ज्यांनी ऐकलें असेल त्यांना त्यांच्या रसिकतेचेंहि दर्शन घडलें असेल. त्यांच्या पाठोपाठ पाटणा विद्यापीठांतील प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयांचे प्राध्यापक काशिप्रसाद जयस्वाल संशोधन संस्थेचे संचालक डॉ. अनंत सदाशिव अळतेकर हे हृदयक्रिया बंद पडून ता. २५ नोव्हेंबर रोजीं कालवश झाले ! नुकत्याच गोहत्ती येथे भरलेल्या अखिल भारतीय इतिहास परिषदेचे ते नियोजित अध्यक्ष असून आपलें अध्यक्षीय भाषण लिहीत असतांनाच त्यांना मृत्यु आला ! केवढें भाग्यवान् मरण ! प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृति व प्राचीन नाणीं यांचे ते गाढे विद्वान् व संशोधक होते. त्यांनी लिहिलेले अनेक ग्रंथ विद्वानांच्या मान्यतेस उतरलेले आहेत. त्यांच्या निधनाने संस्कृत व इतिहास या विषयांतील एक चौरस विद्वान् अकालीं नाहीसा झाला असून त्या क्षेत्रांत एक मोठीच पोकळी निर्माण झाली आहे.

हें हत्याकांड येथेच संपलेलें नाही. महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक रियासतकार गोविंद सखाराम सरदेसाई व सुप्रसिद्ध नट, दिग्दर्शक व बहुरूपी या ग्रंथाचे लेखक चिंतामणराव कोल्हटकर हेहि अनुक्रमे २९ नोव्हेंबर व २३ नोव्हेंबर या दिवशीं निधन पावले. रियासतकार सरदेसाई व चिंतामणराव कोल्हटकर हे अकालीं वारले असें म्हणतां येणार नाही. कारण सरदेसाई ९४ व्या वर्षीं व कोल्हटकर ७० व्या वर्षीं कालवश झाले. मराठ्यांच्या इतिहासाचें सुगम लेखन व पेशवे दप्तराचे संपादन यांच्या रूपाने रियासतकार सरदेसाई यांचें स्मारक महाराष्ट्रांत कायमचेंच राहणार आहे. कै. चिंतामणराव कोल्हटकर हे तर 'बहुरूपी' या ग्रंथाने अजरामरच झालेले आहेत.

या चारहि थोर पुरुषांच्या निधनाने महाराष्ट्राची मोठीच हानि झालेली आहे. त्यांच्या कुटुंबीयांच्या दुःखांत अखिल महाराष्ट्राबरोबरच 'पत्रिके'चा संपादक या नात्याने व व्यक्तिशः मीहि सहभागी आहें.

## विशिष्ट विनोदाचा पोशिंदा गेला !

मराठी नियतकालिकांतून नित्य नेमाने खुसखुशीत प्रसन्न विनोद-निर्मिति करणाऱ्या लेखकांत ज्याला निःसंशय श्रेष्ठ स्थान द्यावें लागेल, ते श्री. दत्तु बांदेकर ता. ४ ऑक्टोबर १९५९ रोजी अगदी अनपेक्षितपणाने कालवश झाले ! साधी राहणी व सोज्ज्वल विनोद-निर्मिति हे त्यांचे स्वभावधर्मच होऊन बसले होते. दैनंदिन राजकारण, समाजकारण व वाङ्मय यांत आढळून येणाऱ्या विसंगतींवर व ढोंगावर नेमकें बोट टेवून खुसखुशीत व प्रसन्न विनोद निर्माण करण्याची त्यांची हातोटी अपूर्वच म्हटली पाहिजे. 'सख्या हरी' या लेखमालेच्या नांवावरून त्यांत अश्लीलता असेल या उत्सुकतेने अनेक वाचकांनी त्या लिखाणाकडे डोळे लावले होते. पण साध्या घरगुती प्रसंगांतून सोज्ज्वल, प्रसन्न व खुसखुसीत विनोद त्या त्या लेखांत त्यांनी निर्माण करून वाचकांच्या अपेक्षा भंग केल्या असल्या तरी त्या लेखांनी त्यांना वेड लावलें हें सांगितलेंच पाहिजे. राजकीय व्यक्तींच्या विसंगत विचारांचें व आचरणांचें मार्मिक विडंबन (carricature) करून त्यांचें खरें स्वरूप ते मोठ्या कौशल्याने प्रकट करीत. प्रासंगिक घटना व विचार यांतून ते हां हां म्हणतां आपल्या विनोद-निर्मितीला लागणारा मसाला गोळा करीत. मराठींतील विनोदी वाङ्मयाचा इतिहास लिहितांना श्री. दत्तु बांदेकर यांच्या लेखन-कौशल्याचा व लेखन-वैशिष्ट्याचा स्वतंत्र प्रकरणांत उल्लेख व विचार करावा लागेल इतकें त्यांचें विनोदी लेखन विविध स्वरूपाचें आहे. त्यांच्या अकालीं मृत्यूने विनोदाच्या क्षेत्रांत मोठीच पोकळी निर्माण झाली असून विशिष्ट विनोदाचा एक चांगला पोशिंदा नाहीसा झाला आहे यांत शंका नाही. त्यांच्या अकालीं नि अनपेक्षित निधनाने मला अत्यंत हळहळ वाटत आहे. ● ● ●

वा. रा. ढवळे

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शुद्धलेखनाच्या नियमांना सरकारी शाळाखात्याची व एस्. एस्. सी. परीक्षा बोर्डाची

# मान्यता!

महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९३० साली मराठी शुद्धलेखनाचे नवीन नियम तयार केले. बहुसंख्य मराठी भाषिकांनी, त्याचप्रमाणे कांही विद्यापीठांनी आणि मराठी नियतकालिकांनी त्या नियमांचा स्वीकार केला. म. सा. परिषदेच्या परीक्षांचा अभ्यास करणाऱ्या उमेदवारांना हेच नियम अभ्यासावे लागत.

तथापि सरकारी शाळाखात्याने ह्या नियमांचा अधिकृतपणे अंगिकार केला नव्हता. गेल्या दोन तीन वर्षांत ह्या शुद्धलेखन नियमांचा फेरविचार झाला. दोन प्रातिनिधिक सभांत कांही दुरुस्त्याहि सुचविण्यांत आल्या. अखेर, एकच दुरुस्ती मान्य होऊन, तिच्यासह १९३० चे नियमच कायम राहिले आणि ऑगस्ट १९५९ च्या वार्षिक साधारण सभेने त्यांना मान्यता दिली.

आतां मुंबई राज्याच्या शाळाखात्याने ह्या नियमांचा स्वीकार करण्याचा नुकताच निर्णय घेतला आहे. त्याचप्रमाणे माध्यमिक शालान्त परीक्षा मंडळानेहि ( एस्. एस्. सी. परीक्षा बोर्डानेहि ) ह्या नियमांचा अंगिकार करण्यांत येत असल्याचा ठराव केला आहे.

येणेंप्रमाणे १९६०-६१ च्या शालेय वर्षापासून हे नियम अमलांत येत आहेत तरी मराठीच्या सर्व अभ्यासकांनी, शिक्षण संस्थांनी, विद्यापीठांनी, लेखकांनी आणि नियतकालिकांनी ह्या शुद्धलेखनाचा अवलंब करून एकसूत्रता आणावी.

य. दि. पेण्ढरकर,
कार्याध्यक्ष.

[ प्रस्तुत शुद्धलेखनाच्या पुस्तिकेच्या प्रती परिषदेकडे विकत मिळतात.
किंमत १५ नये पैसे. ट. ख. निराळा. ]

डॉ. गं. व. ग्रामोपाध्ये

# भाषेचें अवस्थांतर, नामांतर आणि मराठी भाषा.

एका भाषेंतून दुसरी भाषा निर्माण झाली, असें केव्हा म्हणतां येतें? म्हणजे, भाषेचें नामांतर होण्याआधी तिचें जें अवस्थांतर होतें, त्या अवस्थांतराचें स्वरूप काय असतें? एखाद्या भाषेचे केवळ कालिक भेद दाखविणारीं स्थित्यंतरें आणि तिचीं ऐतिहासिक दृष्टया पार नामांतर करणारीं स्थित्यंतरें यांत कोणत्या प्रकारचा फरक असतो! केवळ उच्चारभेदांचा की त्यांहून अधिक मूलगामी स्वरूपाचा?

मराठी भाषेची हयात, आज साधारणपणें आठशे-साडेआठशे वर्षांची आहे. ह्या तिच्या हयातींत कालांतराकालांतराने तिच्या स्वरूपांत कांही फरक होत आले आहेत. उदाहरणार्थ, महानुभावांच्या व ज्ञानेश्वरांच्या यादवकालीन मराठीच्या स्वरूपाहून तदनंतरच्या मुसलमानी अमलांतील, म्हणजेच ज्याला बहामनी काल म्हणून संबोधिलें जातें त्यांतील मराठीचें स्वरूप बदललेलें दिसतें. एकनाथांना ज्ञानेश्वरी 'प्रतिशुद्ध' करावीशी वाटली, ती त्यामुळे. बहामनीकालीन मराठीहून शिवोत्तरकालीन वा पेशवेकालीन मराठी पुनः थोडीफार बदलली आहे; आणि आज पेशवेकालीन मराठीहि जुनी वाटेल इतकें आजच्या मराठीचें रंगरूप निराळें झालेलें आहे. मराठीच्या आजवरच्या जीवमानांत अशीं कांही स्थित्यंतरें झालेलीं असलीं, आणि आजच्या सर्वसामान्य मराठी भाषकाला ज्ञानेश्वरांची वाणी सहजासहजी न समजेल इतक्या गंभीर स्वरूपाची जरी ती असली, तरी ज्ञानेश्वरांच्या काळापासून तों आजतागायत आपण तिला 'मराठी' या नांवानेच संबोधित आलों आहोंत. ज्ञानेश्वर तिला 'मऱ्हाटी' म्हणत, आपण 'मराठी' म्हणतों, इतकाच फरक. म्हणजे, गेल्या आठशे-साडेआठशे वर्षांच्या अवधींत मराठींत जरी कांही भाषिक स्थित्यंतरें झालीं तरी तिने आपलें मराठी हें नांव म्हणजेच आपलें मराठीपण टिकविलें आहे. 'मऱ्हाटी' चें 'मराठी' एवढें फक्त उच्चारांतर झालें; पण नामांतर झालें नाही. याचा अर्थ असा तर नव्हे की, तिच्यांत झालेलीं स्थित्यंतरें नामांतर करण्याइतकीं मूलभूत नव्हतीं, प्राकृतिक नव्हतीं? संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश या मराठीच्या पूर्वपरंपरेंतील भाषांची व त्यामागील स्थित्यंतरांची गोष्ट वेगळी दिसते. संस्कृतपासून प्राकृत भाषा निर्माण झाल्या आणि प्राकृत भाषांपासून अपभ्रंश जन्मल्या; आणि या अपभ्रंशांपासून पुनः स्थानपरत्वें निर्माण झालेल्या भाषा म्हणजे आजच्या मराठी, गुजराथी, बंगाली, हिंदी इत्यादि अर्वाचीन देशी भाषा. वैदिक आर्य हिंदुस्थानांत आल्यानंतर त्यांच्या भाषेचीं आजवर होत आलेलीं हीं प्रमुख स्थित्यंतरें. परंतु हीं स्थित्यंतरें भाषेच्या प्रकृतींत इतका कांही मूलभूत फरक करणारी ठरलीं असलीं पाहिजेत की, त्यामुळे अखेर त्यांचीं नामांतरेंहि झालीं. भाषेचें नामांतर करणारीं हीं स्थित्यंतरें व नामांतर करूं न शकणारीं, पण तरीहि भाषेच्या रंगरूपांत कालमानाने फरक दाखविणारीं मराठी भाषेंतील स्थित्यंतरें यांत कांही मूलभूत फरक असला पाहिजे. हा फरक, तीं तीं स्थित्यंतरें बारकाईने तपासल्यास स्पष्ट होऊं

शकेल; आणि आपोआपच, मराठीच्या आठशे-साडेआठशे वर्षांच्या अवधींत लक्षांत येण्याजोगीं कांही रूपांतरें होऊनहि तिचें नामांतर कां झालें नाही याचीहि कल्पना येऊं शकेल.

भाषापरिवर्तनाचीं वा भाषिक स्थित्यंतराचीं जीं अनेक कारणें आढळतात, त्यांत सर्वांत महत्त्वाचें वा सर्व कारणांच्या मुळाशीं असणारें कारण म्हणजे दोन भिन्न मानववंशांच्या, भिन्न संस्कृतींच्या आणि भिन्न भाषा बोलणाऱ्या समाजांचें संमिश्रीकरण. संस्कृतमधून प्राकृत भाषा जन्मल्या त्या अशाच संमिश्रीकरणांतून. आर्य लोक इराणमार्गें हिंदुस्थानांत आले, ते आपली स्वतःची विशिष्ट संस्कृति व विशिष्ट भाषा घेऊन. हिंदुस्थानांत जे आर्येतर आधीपासून राहत होते, त्यांचीहि कांही एक संस्कृति होती, व त्यांची स्वतःची निराळी भाषाहि होती. परंतु वसाहतीसाठी नवीन आलेल्या आर्यांपुढे त्यांचा टिकाव न लागल्याने त्यांना रानोमाळ परागंदा तरी व्हावें लागलें किंवा वैदिक आर्यांचा सेवाधर्म तरी पत्करून राहावें लागलें. त्रैवर्णिक आर्यांनीहि त्यांना आपल्यांत सामावून घेऊन त्यांचा चतुर्थ वर्ण– शूद्रवर्ण– बनविला. वैदिक धर्मांत सामावून घेतलेल्या आर्येतरांचे त्रैवर्णिक आर्यांवर जे अनेक परिणाम झाले, त्यांत भाषिक परिणाम फार महत्त्वाचा होता. आर्यांची वैदिक संस्कृत भाषा हळूहळू भ्रष्ट होऊं लागली. ही भ्रष्टता त्रैवर्णिक आर्यांच्या शूद्रस्त्रीसंबंधापासून व शूद्रांच्या ( त्रैवर्णिक ) आर्यस्त्रीसंबंधापासून ज्या अनेक संकर जाती निर्माण झाल्या, त्या जातींच्या संस्कृत भाषा बोलण्याच्या प्रयत्नाने अधिकाधिक वाढत गेली, हें वि. का. राजवाडे यांचें मत[1] चिंत्य वाटतें. भाषा भ्रष्ट होण्यास, ती भाषा नव्याने बोलणाऱ्याचा शब्दोच्चार करतांनाचा आळस, किंवा कांही विशिष्ट उच्चार करण्याची शारीरिक ठेवणीमुळे असमर्थता या कारणांच्या जोडीला, शब्दांतील मूळ शब्द किंवा धातु व त्यांना लागणारा प्रत्यय यासंबंधीचें अज्ञान हें एक कारण असतें; नव्हे, तेंच अधिक प्रभावी ठरतें.

उदा० 'धर्म' चा 'धम्म' व 'भक्त' चा 'भत्त' असा जो उच्चार होऊं लागला, तो धर्म व भक्त या शब्दांत मूळ शब्द 'धर्' व 'भक्' हे आहेत व म, त हे त्यांना लागणारे प्रत्यय आहेत, याची जाणीव नसल्याने मूळ शब्दांतील 'र्' व 'क्' यांचे उच्चार अस्पष्ट होत जाऊन, अखेर लुप्त झाले; व परिणामतः पुढील म, त हे प्रत्यय आघातंयुक्त म्हणजे द्वित्त झाले.[2] भिन्न संस्कृतींच्या व भिन्न मानववंशांच्या मिश्रणाचा हा एक वरवरचा परिणाम. तो ज्या कारणांनी घडला तीं कारणें भाषेच्या अंतरंगांत शिरून तिची प्रकृति बिघडविण्याला फारसा वेळ लागत नाही. वैदिक संस्कृत भाषेची या प्रकारें होत गेलेली भ्रष्टता वा तिचें हें संस्कृत भाषकांच्या दृष्टीने अनिष्ट ( पण भाषेच्या विकासक्रमाच्या दृष्टीने स्वाभाविक ) असें परिवर्तन थांबविण्यासाठी, आणि आपली वैदिक संस्कृत भाषा शुद्ध स्वरूपांत टिकविण्यासाठी आर्यांनी आपले मंत्र प्रथम मुखोद्गत करून मग संग्रहितहि केले. ही घटना साधारण इ. स. पूर्वी १५०० च्या सुमारास[3], म्हणजे मौर्य-ब्राह्मी लिपी तयार झाल्यावर घडली असली

१. वि. का. राजवाडे : राधामाधवविलासचंपू–प्रस्तावना, पा. १४५–१४८.

२. धर्म > धम्मः— धर् – म > ध – र्म > ध – र्म > धम्म.
भक्त > भत्तः— भक् – त > भ – क्त > भ – क्त > भत्त.

३. पाहा : सु. कु. चतर्जी-Indo-Aryan and Hindi; Lecture II; P. 48-49, (1942).
Origin & Development of Bengali Language : Introduction; P. 17.

पाहिजे. वेदांतील ( छन्दसि ) भाषा याप्रमाणे शुद्ध राखली गेली, तरी बोली स्वरूपांतील ( भाषायाम् ) भाषेंत बदल होणें थांबलें नाही. आर्य आणि एतद्देशीय आर्येतर यांच्या वाढत्या संबंधामुळे तें शक्यहि नव्हतें. त्यांत आर्यांच्या नवीन नवीन टोळ्या पंजाबांत उतरूं लागल्यामुळे तत्पूर्वी आलेल्या व एतद्देशीयांशीं थोडाफार अधिक संपर्क झालेल्या आर्यांना (होर्नलें, ग्रियर्सन[४] यांच्या याबाबतच्या आंतरवर्तुळ व बहिर्वर्तुळ म्हणून ओळखिल्या जाणाऱ्या सिद्धांताप्रमाणे ) पुढे पुढे म्हणजे पूर्वेकडे व नंतर दक्षिणोत्तर दिशेकडे सरकावें लागलें. त्यामुळे पंजाबांत जेव्हा शुद्ध संस्कृत भाषा बोलली जात होती, तेव्हा गंगायमुनांच्या दुआबांत अर्ध-संस्कृत वा भ्रष्ट संस्कृत बोलली जाऊं लागली; आणि मग त्याच्याहि पूर्वेस (म्हणजे त्या वेळच्या मगधांत) जी भाषा बोलली जाऊं लागली ती अधिकच भ्रष्ट झालेली, म्हणजे पंजाबांतील शुद्ध संस्कृतपासून खूपच दूर गेलेली, अशी होती. स्थानपरत्वें या भिन्नरूप भाषांना उदीच्य, मध्यदेशीय व प्राच्य अशीं नांवें मिळालीं. रूपसंपदेच्या बाबतींत उदीच्य भाषेहून प्राच्य भाषा इतकी निराळी झाली होती की, त्यामुळें त्या त्या भाषा बोलणाऱ्यांना परस्परांच्या भाषा कळेनाशा झाल्या. आर्य भाषेच्या परिवर्तनाचें, भारतांतलें, हें प्रथम पर्व. हें मुख्यतः पूर्वेकडे घडलें, आणि त्यामुळे संस्कृतमधील संयुक्त व्यंजनांच्या उच्चारावर परिणाम झाला.

उदा०— उदीच्य > मध्यदेशीय > प्राच्य

कृत > कत, कित > कट

अर्थ > अत्थ > अट्ठ

अर्ध > अद्ध > अड्ढ

या उदाहरणांवरून र् व ऋ यांच्या नंतर येणाऱ्या दन्त्य व्यंजनांचें मूर्धन्यीकरण आणि संयुक्त व्यंजनांची सवर्णापत्ति ( Assimilation of conjunct consonants ) यांचा मुख्यतः समावेश होतो.

भाषापरिवर्तनाचें हें पहिलें पर्व पूर्ण होण्याला उपकारक अशा दोन घटना या सुमारास घडल्या. पैकी एक उदीच्य देशांत घडली, तर दुसरी प्राच्य देशांत घडली. उदीच्य देशांत पाणिनि जन्माला आला, आणि त्याने उदीच्य संस्कृताची शुद्धता टिकवून धरण्यासाठीं संस्कृत भाषेचें व्याकरण रचिलें ( साधारण इ. स. पूर्व ५ वें शतक ); तर प्राच्य देशांत गौतमबुद्धाचा उदय होऊन त्याने बहुजन समाजाच्या प्राच्य प्राकृताला आपल्या धर्मप्रसाराचें वाहन केलें. ( गौतम बुद्ध–इ. स. पूर्व ५५७–४४७). त्यामुळे संस्कृत भाषेला व्याकरणनियमांची चौकट बसली, तर प्राच्य प्राकृताला धर्मतत्त्व–प्रतिपादनाची प्रतिष्ठा लाभली. प्राकृत भाषेच्या स्थैर्याच्या व विकासाच्या दृष्टीने ह्या दोन्हीहि घटना उपकारक झाल्या. परिणामतः प्राकृताचीं स्थानपरत्वें मागधी, शौरसेनी व महाराष्ट्री अशीं प्रमुख पण परस्परांहून थोडींफार भिन्न अशीं रूपें हळूहळू स्पष्ट झालीं आणि वैदिक संस्कृताचें भारतांतलें पहिलें अवस्थांतर पूर्ण झालें.

प्राकृत भाषेच्या ( वा भाषांच्या ) जन्मामुळे संस्कृत भाषेचें जें अवस्थांतर स्पष्ट झालें, त्या अवस्थांतराचें स्वरूप काय होतें ? केवळ उच्चारांतर, केवळ ध्वनिपरिवर्तन, की त्यांहून कांही अधिक मूलगामी ? भाषापरिवर्तनांत ध्वनिपरिवर्तन तर असतेंच; किंबहुना ती भाषापरिवर्तनाची सुरुवात होय. परंतु केवळ तेवढ्यावरच हें परिवर्तन थांबलें तर त्यातून फार फार तर एखादी स्थानिक पोटभाषा वा बोलभाषा ( dialect ) जन्माला येईल. निराळें स्वतंत्र अस्तित्व असणारी भाषा जन्माला येणार नाही. संस्कृतांतून प्राकृतभाषा जेव्हा जन्मली आणि

४. Grierson : B. S. O. S. Vol. I, No. 3, p. 54.

स्थिर झाली, तेव्हा तिचे संस्कृताहून निराळे असे उच्चारविशेष होतेच; पण त्याहून अधिक म्हणजे तिचा स्वतःचा असा निराळा प्रकृतिविशेषहि होता. तसेंच तिनें घेतलेलें प्राकृत हें नांवहि या दृष्टीने महत्त्वाचें होतें. तें केवळ संस्कृत या शब्दाचें उच्चारांतर नव्हतें. संस्कृत हीच जणू प्रकृति, आणि तिच्यापासून निर्माण झालेली ती प्राकृत असें हेमचंद्रानें[५] आपलें एतद्‌विषयीचें मत दिलें आहे. तें बरोबर असो, की 'राजा प्रकृतिरंजनात्' या कालिदासीय उक्तींत, प्रकृति म्हणजे सर्वसामान्य प्रजाजन असा जो अर्थ आहे, त्या अर्थाप्रमाणे सर्वसामान्यांची भाषा ती प्राकृत भाषा हें मत ग्राह्य ठरो; पण एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसते. आणि ती ही की, 'प्राकृत' या नांवाचा संबंध 'प्रकृति' या शब्दाशीं आहे. आता प्राकृत भाषा केव्हा जन्मली? तर संस्कृत भाषेचें अंतर्बाह्य अवस्थांतर झालें तेव्हा. हें अवस्थांतर पूर्ण होण्यासाठीं संस्कृत भाषेच्या व्याकरणाची संघटना, म्हणजेच तिची प्रकृति, बदलण्याची आवश्यकता होती. ही तिची प्रकृति बदलली तेव्हाच तिच्यांतून नवीन भाषा जन्मली; आणि म्हणून ती 'प्राकृत' या नांवाने ओळखिली जाऊं लागली असें मानणें, मला वाटतें, अधिक अर्थपूर्ण ठरणारें आहे. संस्कृतचें प्राकृतिक अवस्थांतर दाखविणारी आणि म्हणून 'प्राकृत' या नांवाने ओळखिली जाणारी भाषा सर्वसामान्य बहुजनसमाजाची, प्रजाजनांची होती; आणि राजेलोकांच्या संदर्भात प्रजाजन हे 'प्रकृति' म्हणून मानले जात असल्याने, व त्या प्रकृतीची भाषा या अर्थानेंहि 'प्राकृत' हें नांव रूढ होण्याला मदत झाली असावी. अर्थात् 'प्राकृत' हें नांव विशिष्ट भाषेला कसें प्राप्त झालें, हा आपला येथला मुख्य प्रश्न नाही. मुख्य प्रश्न आहे तो हा की, संस्कृतचें जें अवस्थांतर झालें, त्या अवस्थांतराचें स्वरूप काय होतें? त्यांत अशा कोणत्या मूलगामी घटना घडल्या की त्यामुळे संस्कृतचें पार नामांतर झालें?

संस्कृत ही संपूर्ण प्रत्ययी भाषा आहे. नामविभक्ति व आख्यातविभक्ति यांची तिच्यांत विपुलता आहे. वाक्यांतील शब्द कोणत्याहि स्थानीं योजिला तरी केवळ त्याच्या प्रत्ययी रूपामुळे त्याचा अर्थ निश्चितपणें व्यक्त होऊं शकतो. अप्रत्ययी भाषेत वाक्यरचनेला (syntax) जें महत्त्व असतें, तें येथे मुळीच नसतें. संस्कृत भाषेच्या या प्रत्ययी रूपामुळे तिच्यांत एकप्रकारचा ठाशीवपणा उतरला आहे. परंतु या ठाशीवपणामागे व्याकरणनियमांचा जो काटेकोरपणा आहे व पुनः निरनिराळे अर्थ व्यक्त करण्यास अवश्य असा निरनिराळ्या रूपांचा जो पृथगात्म वारकावा आहे, तो हळूहळू कमी होत गेला. सुलभीकरणाकडे भाषकांची जी स्वाभाविक प्रवृत्ति असते ती एतद्देशीय आर्येतरांच्या संबंधामुळे अधिकच बळावली, आणि संस्कृत भाषेचें अवस्थांतर झालें. हें अवस्थांतर किती मूलगामी होतें, प्राकृतिक होतें, आणि म्हणून तें नामांतरहि करूं शकलें याची कल्पना संस्कृत व प्राकृत या भाषांतील उच्चारपद्धति, नामविभक्ति व आख्यातविभक्ति यांच्याकडे जरी वरवर दृष्टि टाकली तरी सहज येऊं शकेल.

संस्कृतमधील वर्णमाला समृद्ध आहे. प्राकृताने तिच्यांतील ऋ, ॠ, ऌ, ॡ, ऐ, औ, ङ्, ञ्, श्, ष्, विसर्ग, प्लुत व व्यंजनान्त शब्द यांना काट दिला[६]. विसर्ग व व्यंजनान्त शब्द गेल्यामुळे विभक्तिरूपांची संख्या आपोआप कमी झाली. संयुक्त व्यंजनाच्या उच्चारांतील एक व्यंजन गाळून दुसऱ्याचें द्वित्व होण्याची प्रवृत्ति बळावली. र्, ऋ यांच्यानंतर येणारें

५. प्रकृतिः संस्कृतं । तत्र भवं तत आगतं वा प्राकृतम् । (हेमचंद्र : ८-१-१)

६. लोकात् इति च वर्तते । तेन ऋ–ॠ–ऌ–ॡ–ऐ–औ–ङ्–ञ्–श्–ष्–विसर्जनीय–प्लुत–वर्जो वर्णसमाम्नायो लोकात् अवगन्तव्यः । (हेमचंद्र : ८–१–१)

दन्त्य व्यंजन सरसहा मूर्धन्य होऊं लागलें. हा झाला फक्त उच्चाराबाबतचा वरवरचा बदल. पण त्याहीपेक्षां खोल, म्हणजे विभक्तिप्रत्यय व आख्यातप्रत्यय यांच्यावरहि प्राकृताने आपला परिणाम केला.

संस्कृतांत विभक्तींची संख्या संबोधन धरून आठ आहे. वचनें तीन आहेत. प्राकृताने प्रथम द्विवचन गाळून एकवचन व बहुवचन अशीं दोनच वचनें ठेवलीं. विभक्तींच्या संख्येतहि तिने काटकसर केली. चतुर्थी कमी करून तिचें कार्य षष्ठी विभक्तीने ती साधूं लागली. संस्कृतमध्ये सर्वनामांचे प्रत्यय स्वतंत्र होते ते येथे नामांनाहि लागूं लागले. सारांश, रूपांची विविधता कमी होऊन प्राकृत भाषा एकरूपतेकडे वळली. संस्कृत भाषेचें अवस्थांतर स्पष्ट करणारा हा एक प्राकृत भाषेचा प्राकृतिक विशेष.

आख्यात–विभक्तींच्या बाबतहि हीच सुलभीकरणाची प्रवृत्ति दिसते. संस्कृतांत एक वर्तमान, तीन भूत व दोन भविष्य असे सहा काळ होते; आणि एक आज्ञार्थ, एक विध्यर्थ व दोन संकेतार्थ असे चार अर्थ होते; म्हणजे क्रियापदरूपें एकूण दहा प्रकारांनीं तयार होत. ह्या दहा प्रकारांत पुन: तीन वचनें व तीन पुरुष यांची भर पडे. शिवाय आत्मनेपद, परस्मैपद व दहा गण यांचे मूळ धातूवर भिन्न भिन्न विकार होत असत तें निराळेच. संस्कृतांत आख्यातरूपांची समृद्धता आढळते ती यामुळे. परंतु प्राकृतांत तिला ओहोटी लागली. द्विवचन गळाल्याचा उल्लेख वर विभक्तींच्या संदर्भात केलेलाच आहे. लकारांच्या म्हणजे क्रियापदरूपांच्या दहा प्रकारांतहि काटछाट झाली. भूतकाळाचे तीन प्रकार व भविष्यकाळाचे दोन प्रकार जाऊन त्यांच्या जागीं प्रत्येकी फक्त एकेकच प्रकार राहिला. किंबहुना, भूतकाळीं आख्यातरूप वापरण्याऐवजी कर्मणि भूतकाळवाचक धातुसाधितांचा उपयोग करण्याची प्रवृत्ति वाढली. संकेतार्थाचेहि जे दोन प्रकार होते त्यांपैकी एकच उरला; म्हणजे संस्कृतमधील एकूण दहा लकारांपैकीं फक्त तीन काळ व तीन अर्थ असे सहा लकार उरले. उदा० वर्तमाना, भूता, भविष्यन्ती, पञ्चमी ( आज्ञार्थ ), सप्तमी ( विध्यर्थ ) व कालातिपत्ति ( संकेतार्थ ). आख्यातरूपसिद्धीच्या बाबतींत संस्कृतमध्ये धातूंचे दहा गण, परस्मैपद, आत्मनेपद वगैरेंचा जो विचार करावा लागे, तो प्राकृताने पार टाकून दिला. इतकेंच नव्हे तर, वर्तमानकाळी रूपाने कोणताहि काळ व विध्यर्थी रूपाने कोणताहि अर्थ व्यक्त होऊं लागला. सारांश, जी आख्यातरूपांची समृद्धि संस्कृत भाषेला भूषणावह होती, नव्हे जी तिच्या प्रकृतीचा गाभा होती, तीच मुळी पार पालटली. ध्वनिपरिवर्तनाने तिचें बाहेरचें उच्चारणरूप बदललें होतेंच, परंतु विभक्ति आणि आख्यात यांच्यांत झालेल्या फरकाने तिच्यांत अंतर्बाह्य आणि मूलभूत बदल झाला. हा बदल मूळ संस्कृतापासूनच झाला असला तरी तो इतका प्राकृतिक होता की, त्या बदलाने प्राप्त झालेल्या तिच्या स्वरूपाला संस्कृत या नांवाने संबोधणें अशक्य होतें; आणि म्हणूनच अवस्थांतराबरोबर तिचें नामांतरहि झालें आणि प्राकृत या नांवाने ती ओळखिली जाऊं लागली. संस्कृत भाषेचें नामांतर करणारें हें पहिलें स्थित्यंतर. हें साधारण इ. स. पू. ६०० च्या सुमारास सुरू झालें, आणि इ. स. ६०० पर्यंत टिकलें.

आतांपर्यंतच्या विवेचनांत प्राकृत या नांवाने ज्या भाषेचा उल्लेख केला तिच्यांत वस्तुतः स्थानपरत्वे कांही फरक आढळतात. मागधी, शौरसेनी, महाराष्ट्री अशीं जीं तिचीं नांवें आढळतात तीं त्यामुळे. परंतु त्यांच्यांत वेगळेपणापेक्षा सारखेपणाच अधिक होता. म्हणून तर वररुचि आपल्या प्राकृत व्याकरणांत प्रथम महाराष्ट्रीचें व्याकरण देऊन इतरांबद्दल ( त्यांच्या कांही विशेष लकबा सांगून झाल्यावर ) ‘ शेषं महाराष्ट्रीवत् ’ म्हणतो. प्राकृत

भाषांतील या सारखेपणामुळे व विशेषतः ज्या अवस्थांतराचा आपण विचार करीत आहोंत त्या अवस्थांतराच्या विचारांत या सारखेपणांत सामावलेले गुणधर्म अधिक महत्त्वाचे असल्या-मुळे, त्यांचा उल्लेख प्राकृत भाषा या एकेरी नांवाने केला आहे.

प्राकृत भाषेची हयात साधारणतः हजारएक वर्षांची दिसते (साधारण इ. स. पू. ५०० ते इ. स. ६००). त्या अवधींत ती स्थिर झाली; प्रतिष्ठित झाली. धर्माचें तत्त्वज्ञान सांगूं लागली. साहित्य निर्माण करूं लागली. पण असें होत असतांना ती हळूहळू बहुजन-समाजापासून दूरदूरहि जाऊं लागली. त्यांत साधारण इ. स. ६०० च्या सुमारास वा थोडें आधी तिच्यावर एक गंडांतर आलें. तिला परकीय भाषेशीं पुनः एकदा संघर्ष द्यावा लागला. पल्लव, शक, गोपाळ, अहिर[७] इत्यादि अन्य धर्मांचे, अन्य मानववंशांचे व अन्य भाषांचे लोक पंजाबमार्गें हिंदुस्थानांत शिरले व कांहीं काळ राज्यपद भोगून,[८] स्वतःच्या हीन संस्कृतीमुळे आर्यभारतीय प्राकृत भाषकांत मिसळून गेले, आणि प्राकृत भाषा बोलूं लागले. या साऱ्यांचा परिणाम प्राकृत भाषांचें पुनः अवस्थांतर होण्यांत झाला. आधीच प्राकृत भाषेला शिष्टमान्यता लाभल्याने बहुजनसमाजाच्या बोलण्यांतून ती कमी होऊं पाहत होती. त्यांत या हीन संस्कृतीच्या नवीन लोकांच्या बोलण्याचा तिच्यावर खोल परिणाम झाला. तिला अपभ्रष्ट, अपभ्रंश असें रूप आलें. अपभ्रंश म्हणजे शिष्टमान्य भाषेपासून घसरलेली, अभीरादि[९] लोकांकडून बोलली जाणारी गांवढळ भाषा. शिष्ट प्राकृत भाषकांनी तुच्छतेने या गांवढळ भाषेला अपभ्रंश म्हणून संबोधिली, आणि तेंच नांव नंतर रूढ झालें. परंतु हें रूढ होण्यापूर्वी, म्हणजे अपभ्रंश भाषा स्थिर होण्यापूर्वी प्राकृत भाषेचें अवस्थांतर पूर्ण झालें असलें पाहिजे; त्याविना हें नामांतर होणार नाही. तेव्हा प्रथम त्या अवस्थांतराचें स्वरूप पाहिलें पाहिजे.

प्राकृत भाषेत सुलभीकरणाची जी प्रवृत्ति दिसते तिचीच पुढची अवस्था अपभ्रंशांत आढळते. उच्चारांच्या बाबतींत अपभ्रंश भाषेने सामान्यतः प्राकृत भाषेची परंपरा पाळलेली असली, तरी त्यांच्यांतहि थोडाफार फरक केलेला आहेच. प्राकृतांत शब्दांच्या अंतीं येणारे आ, ए आणि ओ अपभ्रंशाने अ, इ आणि उ केले. स–स्स यांचा उच्चार ह केला. हा झाला फक्त उच्चारांतील ठळक फरक. पण विभक्ति व आख्यात यांच्या बाबतींतहि अपभ्रंश भाषेने पुढचा टप्पा गाठला. प्रथमेच्या 'अ'कारान्त नामाच्या एकवचनीं 'उ' व बहुवचनीं 'अ' हे प्रत्यय विशेषत्वाने येऊं लागले. तृतीयेचा 'इण' व षष्ठीचा 'स्स' ह्यांखेरीज संस्कृतांतून परंपरेने आलेले इतर सर्व प्रत्यय अपभ्रंशांत लोपले. विभक्तिरूप सहायशब्दांनी कारकसंबंध दाखविण्याचा प्रघात वाढला. हे सहायशब्द सामान्यतः नामांच्या षष्ठीच्या रूपांना लागत. ज्या शब्दयोगी अव्ययांचा उपयोग मराठीने सरसहा करावयाला सुरुवात केली व ज्यामुळे मराठीला अर्धप्रत्ययी-अर्धसामासिक असें स्वरूप प्राप्त झालें त्या शब्दयोगी अव्ययांची सुरुवात अप-भ्रंशांतील या विभक्तिरूप सहायशब्दांत आढळते.

आख्यातांची संख्या प्राकृतांतील आख्यातांहूनहि अपभ्रंशकालीं घटली. काळांच्यापैकी वर्तमान व भविष्य यांचींच आख्यातरूपें उरलीं. कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाने

७. दा. पां. गुणे—भविसयत्तकहा : प्रस्तावना, पा. ५९–६०.
दा. पां. गुणे— विविधज्ञानविस्तार, वर्ष १९२२; पा. ३००.

८. D. S. Sircar's article in "The Age of Imperial Unity" pp. 221-223.

९. अभीरादिगिरः काव्येष्वपभ्रंश इति स्मृताः। शास्त्रेषु संस्कृतादन्यदपभ्रंशतयोदितम्॥ (काव्यादर्श).

भूतकाल व्यक्त होऊं लागला. अर्थोपैकीं आज्ञार्थ व कांहीं थोड्या प्रमाणांत विध्यर्थ एवढ्यांचाच उपयोग होऊं लागला. संयुक्त क्रियापदांचे प्रयोग अधिकाधिक केले जाऊं लागले. सारांश, प्राकृतकालीं जें परिवर्तन सुरू झालें होतें त्याचें पुढचें पर्व अपभ्रंशकालीं पुरें झालें. अर्थात् हें प्राकृतानंतरचें अवस्थांतर असलें व त्यामुळे त्याचें नामांतर होऊन अपभ्रंश हें नांव प्राप्त झालेलें असलें तरी तें प्राकृतांतर्गत होतें असें दिसतें. म्हणून तर अपभ्रंशाच्या अवस्थांतराला मध्ययुगीन आर्यभारतीय ( MIA ) म्हणजेच प्राकृत भाषेच्या मोठ्या अवस्थांतरांतील अखेरचा कालखंड मानण्याची प्रथा पडली आहे. परंतु असें असलें तरी तें अवस्थांतर नामांतर करण्याइतकें प्रभावी होतें, हें स्पष्ट दिसतें.

अपभ्रंश भाषा साधारण ११ व्या शतकापर्यंत टिकली. तिचा काल सुमारें इ. स. ६०० ते १०००. त्याच्या एकदोन शतकें आधी, म्हणजे इ. स. च्या आठव्या शतकापासून अरबादि भिन्न धर्मांच्या, भिन्न वंशांच्या व भिन्न संस्कृतींच्या लोकांनी हिंदुस्थानवर स्वारी करावयाला आरंभ केला होता.* ११ व्या शतकांत ते टोळीटोळीने येथे येऊन स्थायिक होऊं लागले. ह्या घटनेंतूनच हिंदुस्थानांत नवीन भाषांचा उदय झाला. ही गोष्ट साधारण ११ व्या शतकांत घडली. म्हणजे ६ व्या शतकापासून तों ११ व्या शतकापर्यंत टिकलेल्या अपभ्रंश भाषेंत स्थानपरत्वें फार मोठें स्थित्यंतर झालें; आणि आजवर रूढ असणाऱ्या मराठी, गुजराथी, बंगाली, हिंदी वगैरे देशी भाषा जन्मल्या.

मराठी, गुजराथी वगैरे अर्वाचीन देशी भाषांचा जन्म म्हणजे आर्यभारतीय भाषांच्या जीवमानांतील प्राकृतानंतरचें फार मोठें स्थित्यंतर. संस्कृतांतून प्राकृताचा जन्म होतांना जसा एक गदारोळ झाला, तसाच गदारोळ याहि वेळेस झाला. मात्र या गदारोळाचें स्वरूप थोडें निराळें होतें. आर्य लोक हिंदुस्थानांत आले ते आपली संस्कृति व श्रेष्ठ देववाणी घेऊन. ही देववाणी वा वेदवाणी शुद्धरूपांत राखण्याचा त्यांचा सतत यत्न होता. परंतु एतद्देशीय आर्येतरांच्या संबंधामुळे तो यशस्वी होऊं शकला नाही. आर्येतरांना संस्कृत वाणी तिच्या मूळ रूपांत झेपणें शक्य नव्हतें. साहजिकच त्यांनी तिला त्यांना सोइस्कर असें जें रूप दिलें, त्यांतून प्राकृतभाषा जन्मल्या. म्हणजे प्राकृत भाषांचा जन्म झाला तो एतद्देशीय आर्येतरांच्या संस्कृत वाणी शुद्धरूपांत वापरण्याच्या असमर्थतेमुळे. परंतु अपभ्रंशांतून मराठी, गुजराथी वगैरे देशी भाषा जन्मल्या त्या

* ( १ ) ८ वें शतकः– ( इ. स. ७१२ ) अरबांची जलमार्गें सिंध व कच्छ यांवर स्वारी; सिंध व मुलतान येथे राज्य; गुजराथ, राजस्थान येथें धामधूम.

( २ ) १० वें शतकः– तार्तर अफगाणिस्तान जिंकून सिंधूच्या अलीकडे घुसले. त्यामुळे हूणांच्याबरोबर आधी आलेल्या गुर्जर, परमार, चालुक्य, चौहाण ह्या क्षत्रिय कुळ्या पूर्वेकडे व दक्षिणेकडे घुसल्या व हिंदु लोकांत मिसळल्या.

( ३ ) ११ वें शतकः– गझनीच्या महंमदाच्या स्वाऱ्या ( इ. स. १००१–१०२४ पर्यंत १७ स्वाऱ्या ); सोमनाथाची लूट; त्यामुळे गुजराथमधील कांही लोक देशांत उतरले.

( ४ ) १२ वें शतकः–महंमद घोरीची स्वारी. त्याला येथे राज्य करण्याची इच्छा होती; त्यामुळे अन्य संस्कृतीचा व अन्य मानववंशाचा एक मोठा गट हिंदुस्थानांत घुसला व माळवा, राजपुताना, गुजराथ ह्या भागांत वसवला. घोरीने आपले सरदार पूर्वेकडे व दक्षिणेकडेहि पाठविले. शहाबुद्दीन घोरीने पृथ्वीराजाचा पराभव केला.

( ५ ) १३ वें शतकः– इ. स. १२०५ पर्यंत बहुतेक सारें उत्तरहिंदुस्थान मुसलमानांनी जिंकलें; आणि मग ते दक्षिणेकडेहि वळले.

१२९४ देवगिरीच्या यादवांचा पराजय.

बाहेरून आलेल्या अरब दि आर्येतर लोकांच्या संसर्गानें. म्हणजे येथे बाहेरून आलेल्या भिन्न धर्मांच्या, भिन्न वंशांच्या व भिन्न भाषा बोलणाऱ्या पण येथेच या ना त्या प्रकारें स्थायिक झालेल्या लोकांच्या प्राकृत भाषा बोलण्याच्या प्रयत्नांतून अर्वाचीन देशी भाषा जन्मल्या, असा याचा अर्थ झाला; आणि तो खराहि असावा. कारण हे नवीन आलेले लोक धर्मासंबंधी जितके कडवे होते तितके भाषेसंबंधी नव्हते. साहजिकच धर्माची जशी त्यांनी म्हणजे त्यांच्या राज्यकर्त्यांनी सक्ती केली तशी सक्ती भाषेची केली नाही. किंबहुना त्यांच्यापैकी जे एतद्देशीयांत मिसळले त्यांनी त्यांच्या अपभ्रंशांतच बोलण्याचा प्रयत्न केला. अर्थात् या प्रयत्नांत त्यांच्या अरबी-फार्शीचा परिणाम एतद्देशीय प्राकृत अपभ्रंशावर न होता तरच नवल; आणि या परिणामांतूनच अपभ्रंशाचें फार मोठें अवस्थांतर झालें आणि अर्वाचीन देशी भाषांचा जन्म झाला.

अर्वाचीन देशी भाषांना या अवस्थांतरानंतर जें रूप आलें (निदान मराठीला जें विशिष्ट स्वरूप आलें) त्यांत भाषाविकसनाची व त्यासाठी नवनवीन रूपें घेण्याची प्रवृत्ति जशी आढळते, तशीच भाषेला स्थैर्य प्राप्त करून देण्याची वृत्तीहि आढळते. जन्मल्यानंतर एकदोन शतकांतच मराठी भाषा बोलीबरोबर लेखनाचाहि संसार करूं लागली; आणि तें लेखनहि कथाकथनात्मक किंवा तत्त्वविवेचनात्मक अशा प्रकारचें. इतकेंच नव्हे तर, या प्रकारानें प्राप्त झालेल्या शिष्टमान्यतेबरोबर व्याकरणमान्यताहि तिला मिळाली. या ज्या भिन्न प्रवृत्ति जन्मापासूनच मराठीच्या स्वभावांत एकवटलेल्या दिसतात, त्यांना एक महत्त्वपूर्ण घटना कारण झाली असावी; आणि ती घटना म्हणजे शंकराचार्यांनीं केलेलें वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन. अर्थात् ही घटना मराठीच्या जन्माआधी चारपांच शतकें घडलेली होती. परंतु तिच्यामुळे संस्कृत भाषेला पुनः महत्त्व आलें. निरनिराळीं पुराणें आणि तत्त्वविवेचनात्मक ग्रंथ यांचें लेखन पुनः संस्कृतांतून होऊं लागलें. अर्थात् प्राकृत भाषांच्या तेजीच्या काळांतहि ग्रंथलेखनाची भाषा म्हणून संस्कृतचें महत्त्व कमी नव्हतें. वररुचि, हेमचंद्र यांचीं प्राकृत भाषांचीं व्याकरणें संस्कृतांतच लिहिलीं आहेत, हें या संदर्भात लक्षांत घेण्यासारखें आहे. परंतु वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनानंतर तिचें महत्त्व अधिकच वाढलें. महाराष्ट्रांतील चालुक्य व यादव या राजवटींनी संस्कृत ग्रंथकारांना दिलेलें प्रोत्साहनहि बहुजन समाजावर संस्कृत भाषेचा पगडा बसविण्यास कारण झालें असावें. परिणामतः लौकिक बोलभाषा सुसंस्कृत होऊं लागली. तशांत स्त्रीशूद्रादिक सामान्य मुमुक्षूंच्या कैवारानें संस्कृतांत सांगितलेलें मोक्षमार्गाचें तत्त्वज्ञान प्राकृत मराठींत सांगण्याचा विडा मराठी ग्रंथकारांनी उचलला. साहजिकच ज्या कुणा मराठीच्या ज्ञानेश्वराला वा दामोदर-नरेंद्रादिकांना मराठींतून लेखन करावयाचें होतें, त्यांना प्रथम संस्कृतांत पारंगत असणें इष्ट झालें. ग्रांथिक मराठींत संस्कृत तत्समांचें वा संस्कृत रूपांचें प्रमाण अधिक आढळतें तें यामुळे. परंतु येथे मुख्य मुद्दा असा की, भाषाविकासाच्या अवस्थांतरांत मराठी भाषा अपभ्रंशाचा पुढचा टप्पा गाठून, म्हणजे अपभ्रंशांतील प्रत्ययांना काटछाट देऊन अधिकाधिक सोपी होण्याचा एकीकडून प्रयत्न करीत असतांनाच, दुसरीकडून मध्यंतरीं लोप पावलेल्या संस्कृत उच्चारांचा, तत्सम शब्दांचा व कांही संस्कृतच्या वळणांचीं रूपें पुनः तयार करण्याचा प्रयत्न करून, ती भारदस्त आणि सुसंस्कृतहि होऊं पाहत होती. दोन भिन्न प्रवृत्तींचा मजेशीर संगम मराठी भाषेंत तिच्या जन्मापासून दिसतो तो असा. म्हणजे एकीकडून नवनिर्मितीच्या उत्साहानें ती नवीन रूप घेत होती, तर दुसरीकडून त्या रूपाला संस्कृतच्या आधारानें केलेल्या लेखनांतून पुनः सुव्यवस्थित व सुस्थिर असा घाटहि देऊं पाहत होती. याचा सुपरिणाम असा झाला की, जन्मापासूनच तिला एकप्रकारचा नवीन जोम आला; प्रतिकाराची नवीन शक्ति आली; आणि ही नवी शक्ति इतकी प्रभावी होती

की, तिच्या जन्मानंतर लागलीच एक-दोन शतकांनीं राज्यकर्त्यांच्या अरबीफार्शीने जरी तिच्यावर जबरदस्त आक्रमण केलें, तरी ती आपलें स्वत्व टिकवूं शकली. मराठीने आपल्या जन्मापासून संस्कृतचें स्तन्य पिऊन, नवनिर्मितीबरोबर सुव्यवस्था राखण्याचें व बोलीव्यवहाराबरोबर ग्रंथलेखनहि करण्याचें जें धोरण स्वीकारलें, त्यामुळेहि असेल कदाचित्, पण गेल्या आठशे-साडेआठशे वर्षांच्या अवधींत तिच्यावर जरी कांहीं गंडांतरें आलीं तरी फक्त तिच्या बाह्य रूपांत थोडाफार बदल झाला, अंतरंगांत नाहीं. म्हणजे कालांतराने तिच्यांत कांही फरक पडत गेलेला दिसला तरी तें तिचें स्थित्यंतर नव्हतें, अवस्थांतर नव्हतें; निदान तिचें नामांतर करूं शकेल अशा प्राकृतिक स्वरूपाचें नव्हतें, एवढें खास.

मराठी भाषा इतर अर्वाचीन देशी भाषांप्रमाणे इसवी सनाच्या ११ व्या शतकांत जन्मली. त्याच्याआधीं एखादें शतक अपभ्रंशाच्या ज्या अवस्थांतरांतून ती जन्मली त्या अवस्थांतराला सुरुवात झाली असावी. हें जें अवस्थांतर झालें, व ज्यामुळे मराठीची प्रकृति विशिष्ट प्रकारची बनली असें वर म्हटलें, त्या अवस्थांतराचें स्वरूप तरी काय होतें ? प्राकृतांतून अपभ्रंश भाषा जन्मली त्या वेळीं झालेल्या स्थित्यंतराहून हें स्थित्यंतर निराळ्या प्रकारचें होतें का ? आणि निराळ्या प्रकारचें म्हणजे तरी काय ? ज्या दोन भिन्न प्रवृत्ति तिच्यांत तिच्या जन्मकाळींच उतरल्या असें दिसतें त्या प्रवृत्ति कोणत्या ? व त्यांचें स्वरूप काय होतें ?

संस्कृतांतून प्राकृत व प्राकृतांतून अपभ्रंश या भाषा जन्मल्या तेव्हा मूळ संस्कृतमधील उच्चार सोपे करून उच्चारण्याची पद्धति जशी वाढत गेली तशी उच्चारांच्या सोपेपणाची पद्धति मराठींतहि वाढत गेलेली दिसली पाहिजे; आणि तशी ती कांही प्रमाणांत दिसतेहि. मराठीने भाषाविकासाच्या बाबतींत अपभ्रंशाच्या पुढचा टप्पा गाठल्याने तें स्वाभाविकच होतें. मराठींत तद्भव शब्दांचें प्रमाण अधिक आहे, तें त्यामुळे. पण येथे निवळ तद्भव शब्द नाहींत, तत्सम शब्दहि आहेत. त्यामुळें जे उच्चार प्राकृतांत व अपभ्रंशांत लोपले होते, ते मराठींत पुनः उतरले.

उदा० प्राकृतांत ऋ, ॠ, ऌ, ऐ, औ व विसर्ग हे लोपले होते, ते मराठीने पुनः आणले. पैकीं ऋ व विसर्ग हे फक्त तत्सम शब्दांत आढळतात; तर ऐ, औ हे तत्सम व तद्भव या दोन्ही प्रकारच्या शब्दांत आढळतात. कारण प्राकृतांत द्विस्वरांतर्गत व्यंजनलोपामुळे उत्पन्न झालेल्या स्वरांचा, म्हणजे अ + इ व अ + उ यांचा, संधि करून त्यांचा उच्चार करण्याची पद्धति मराठीने स्वीकारली. ( उदा० प्रतिष्ठान > पइट्ठाण > पैठण; चतुर्थ > चउत्थ > चौथ ). याप्रमाणे मराठीने आपली स्वरसंख्या वाढविली. व्यंजनांच्याबाबतहि हीच गोष्ट दिसते. उदा० श, ष, स या तिहींचा उच्चार. अपभ्रंशांत श, ष, स यांऐवजी फक्त 'स' येई; तत्समशब्दांमुळे मराठीने पुनः श, ष उच्चारावयाला सुरुवात केली. मराठींतील उच्चारांची ही वाढ मुख्यतः तिच्यांत आलेल्या तत्सम शब्दांमुळे झालेली आहे. मराठीचें संस्कृतीकरण झाल्यासारखें वाटतें तें मुख्यतः यामुळे. मात्र असें असलें तरी तत्समापेक्षा तद्भवांचा भरणा अधिक असल्यामुळे, व त्यांतील उच्चारप्रक्रिया अपभ्रंशांतील उच्चारप्रक्रियेच्या पुढची अवस्था दाखवीत असल्यामुळें, उच्चारांच्या बाबतींत मराठीने नव्याजुन्यांचा संगम साधला, असें म्हटलें पाहिजे.

विभक्तिप्रत्ययांच्या बाबतींतहि अशीच नव्याजुन्यांचा समन्वय करण्याची प्रवृत्ति दिसते. म्हणजे एकीकडून मराठी भाषा आपल्या विकासक्रमांतील अपभ्रंशाचा पुढचा टप्पा

२

गाठूं पाहत होती तर दुसऱ्या बाजूने संस्कृतच्या वळणाने आपली रूपसंपदा वाढविण्याचा प्रयत्न करीत होती. या प्रयत्नाचें दृश्यफल म्हणजे प्राकृतांत व अपभ्रंशांत लोपलेली चतुर्थी विभक्ति मराठीने पुनः आणली, आणि विभक्तींची संख्या, संबोधनासह पुनः संस्कृताप्रमाणे आठ केली. मात्र हें करतांना षष्ठीचा स्य > स हा प्रत्यय चतुर्थीला लावून षष्ठीसाठी तिने नवा 'च' हा विशेषणात्मक प्रत्यय बनविला. तसेंच तृतीया, पञ्चमी व सप्तमी यांचे संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश यांतून परंपरेने आलेले प्रत्यय सोडले तर बाकीच्या विभक्तींचे प्रत्यय तिने नवीन बनविले. हे प्रत्यय मुख्यतः शब्दसाधित आहेत. शिवाय प्रत्ययांचें कार्य शब्दयोगी अव्ययांनी सरसहा केलें जाऊं लागलें. हीं शब्दयोगी अव्ययें तृतीया, पञ्चमी व सप्तमी यांनाहि लागत. तसेंच विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें लागण्यापूर्वी प्रातिपदिकांचें सामान्यरूप होऊं लागलें, आणि हें सामान्यरूप प्रातिपदिकाच्या लिंगानुसार आणि अन्त्यानुसार बदलूंहि लागलें. नामविभक्तींची रूपसंपत्ति प्रत्ययी व सामासिक या दोन्ही प्रकारें वाढली ती अशी.

आख्यातविभक्तीच्या बाबतींत मराठीने याहून अजब कामगिरी केली आहे. प्राकृत-अपभ्रंशांत तीन काळ आणि तीन अर्थ मिळून फक्त सहा आख्यातें होतीं. त्यांत मराठीने जुन्या लट्पासून व्युत्पादितां येणाऱ्या रीतिभूतकाळाची भर घातली. तसेंच रीतिभूत, आज्ञार्थ, विध्यर्थ व भविष्य यांचीं रूपें परंपरागत म्हणून तिने स्वीकारलीं; पण उरलेल्या वर्तमान, भूत व संकेतार्थ यांचीं रूपें कृदन्तांच्या साहाय्यानें तिने नवीन बनविलीं. कृदन्तसाधित भूतकाळी क्रियापदांच्या जोडीला संस्कृतमधील भूते लङ् (Imperfect) पासून आलेलीं भूतकाळीं रूपेंहि मराठीने वापरावयास सुरुवात केली. हीं रूपें व रीतिभूताचीं रूपें सारखीं दिसत हा भाग वेगळा. परंतु नवीन भूतकाळी क्रियापदाबरोबर जुनें भूतकाळी क्रियापद वापरणें म्हणजे एक-प्रकारचें संस्कृतचें अनुकरण करण्यासारखें होतें. कृदन्तसाधित रूपें, अर्थात् विशेषणात्मक असल्याने कर्त्याच्या लिंगभेदानुसार तीं बदलूं लागल्यास नवल नाही. याचाच अर्थ असा की, क्रियापदिक वाक्यरचनेऐवजी, म्हणजे ज्यांत क्रियापद कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणे न बदलतां अविकृत राहतें अशा वाक्यरचनेऐवजी, ज्यांत कर्त्याच्या लिंगभेदाप्रमाणे क्रियापदहि बदलतें अशा नामिक पद्धतीने (Nominal construction) वाक्यरचना होऊं लागली. मला वाटतें मराठीचा हा एक विशेष आहे. या प्रत्ययी व कृदन्तसाधित आख्यातरूपांबरोबर संयुक्त क्रियापदांचाहि उपयोग मराठींत होऊं लागला. आणखीहि एक गोष्ट मराठींत दिसते; आणि ती म्हणजे तृतीयान्त भावे प्रयोगाची पुनः सुरुवात. हा भावे प्रयोग प्राकृतांत व अप-भ्रंशांत लोपला होता आणि आजच्या मराठींतहि तो नाहीं. परंतु यादवकालीन मराठींत तो स्पष्टपणें आढळतो. यादवकाळांत मराठी भाषेचें जें संस्कृतीकरण झालें त्याचा हा आणखी एक पुरावा. सारांश, नामविभक्ति व आख्यातविभक्ति यांच्या बाबतींत कांहीं प्रमाणांत जरी मराठी भाषा आपलें प्रत्ययी रूप कमी करून सामासिक रूपाकडे वळलेली दिसत असली व तद्द्वारा आपल्या विकासक्रमांतील पुढचा टप्पा गाठूं पाहत असली, तरी त्या तिच्या विकासक्रमांत संस्कृतीकरणाच्या संस्कारांचीहि भर पडलेली दिसते. मात्र हें संस्कृतीकरण म्हणजे संस्कृतमधील प्रत्ययी स्वरूपाचें केवळ उसनें अनुकरण नव्हे; तर नवीन प्रत्यय बनवून नवीन पद्धतीने भाषेची प्रत्ययी संघटना करण्याचें हें धोरण आहे. या बाबतींत मराठी आणि 'बहिर्कुलां'तील इतर आर्यभारतीय भाषा वैदिक संस्कृतच्या जवळ जाऊं पाहत आहेत, हें ग्रिअर्सनचें म्हणणें येथे आठवतें. ते म्हणतात,

"More in The Outer Indo-Aryan Vernaculars, we see the analytic form of language again disappearing and in the process of being

replaced by a new synthetic form comparable, in its principles, with that of Primary Prākrit ".[१०]

मराठींत झालेल्या स्थित्यंतराचें स्वरूप हें असें आहे. तें अपभ्रंशाचें प्राकृतिक बदल करणारें आहे; आणि म्हणूनच अपभ्रंशाचें नामांतर होऊन ज्या मरहट्ट लोकांच्या बोलींतून ते विशेषतः व्यक्त झालें, त्या मरहट्टांच्या नांवाची खूण ज्यांत स्पष्ट दिसतें अशा मऱ्हाटी > मराठी या नांवानें तें ओळखिलें जाऊं लागलें.

आतां येथें, प्रस्तुत निबंधाच्या सुरुवातीला जो प्रश्न उपस्थित केला होता त्या प्रश्नाचें उत्तर देणें सोपें होईल. तो प्रश्न असा की, मराठीच्या जन्मानंतर गेल्या आठशें–साडेआठशें वर्षांच्या अवधींत तिच्या स्वरूपांत पुष्कळ बदल झालेला असला तरी तिचें नामांतर कां झालें नाहीं? मुसलमानी राजवटींत तर फार्शीच्या संसर्गानें ती इतकी 'भ्रष्ट' झाली होती की, ती फार्शी की मराठी याची ओळख पटत नव्हती. पण तरीहि ती आपलें स्वत्व टिकवून नामांतर होऊं न देतां जिवंत राहिली, ती कां आणि कशी? अव्वल इंग्रजींत इंग्रजी भाषेचा रेटाहि कांही कमी नव्हता. इंग्रजी–मराठींचे धेडगुजरी प्रयोग कांही कमी प्रमाणांत मराठींत शिरले नाहींत. इंग्रजी भाषा तर प्रकृतीनें मराठीच्या पार विरुद्ध; म्हणजे मराठी पुष्कळ प्रमाणांत संस्कृतसारखी प्रत्ययी तर इंग्रजी जवळजवळ संपूर्णपणें सामासिक. पण असें असूनहि मराठी ही मराठी राहिली. याचेंहि कारण काय? म्हणजे मराठी भाषेंत लक्षांत येतील अशीं अवस्थांतरें होऊनहि तिच्यांतून नवीन नांव घेणारी नवीन भाषा जन्माला आली नाही तो कां? मला वाटतें या प्रश्नाचें उत्तर वर सूचित झालें आहे. तें असें की, ज्या प्रकारचें अंतर्बाह्य व प्राकृतिक बदल करणारें अवस्थांतर प्राकृत, अपभ्रंश वा मराठी या भाषा जन्मण्याच्या वेळीं झालें तशा प्रकारचें अवस्थांतर अजून मराठींत झालेलें नाहीं. परंतु तशा प्रकारचें अवस्थांतर झालें नाहीं, म्हणजे तरी काय? त्या अवस्थांतराच्या स्वरूपांत असें काय होतें की, त्यामुळें मराठीचें नामांतर होऊन तिच्यांतून नवीन भाषा जन्माला आली नाही? या प्रश्नाच्या उत्तरासाठी मराठींत झालेल्या अवस्थांतराचें निदान स्थूल तरी अवलोकन केलें पाहिजे.

इ. स. १३१८ मध्ये यादवांचा संपूर्ण पाडाव होऊन राज्याचीं सूत्रें मुसलमानांकडे गेलीं व राज्यव्यवहारासाठी फार्शीचा उपयोग होऊं लागला. हळूहळू फार्शी भाषा बाजारहाटाकडे वळली व सर्वसामान्य जनतेच्याहि मराठीवर ती परिणाम करूं लागली. हा परिणाम अनेक प्रकारें झाला. शेकडो फार्शी शब्द व त्यांचे उच्चार तर मराठींत शिरलेच, पण त्याबरोबर फार्शी प्रयोग व फार्शी प्रत्ययहि मराठींत घुसून मराठीचें स्वरूप विद्रूप करूं लागले. उदा० मराठींतील कण्ठ्य उच्चार संस्कृतमधील कण्ठ्य उच्चारासारखा आहे. पण काफर, तनखा यांसारख्या शब्दांमुळे क, ख यांचा एक विशिष्ट घशांतून उच्चारलेला कण्ठ्य रूढ झाला. व्यंजनान्त शब्द उच्चारण्याची पद्धति प्राकृतकाळींच लोपली होती, ती पुनः सुरू होऊन फार्शी शब्दांबरोबर जातिवंत मराठी शब्दहि व्यंजनान्त उच्चारले जाऊ लागले. महाप्राणमिश्रित उच्चाराची एक विशिष्ट लकबहि मराठींत उतरली. दन्त्यतालव्य उच्चार मराठींत होतेच; पण फार्शींत दन्ततालव्य 'ज' साठी 'जाल,' 'जे,' 'ज्वाद' व 'जो' अशीं जीं चार अक्षरें आहेत त्यांच्या उच्चारभेदाचा परिणामहि मराठींतील दन्त्यतालव्यावर झाला. हा झाला नुसत्या उच्चारांचा कांही परिणाम. परंतु जे फार्शी शब्द शेकड्यांनी मराठींत शिरले व त्यांतील शब्दसिद्धीच्या प्रत्ययांचा मराठी शब्दसिद्धीवरहि जो परिणाम झाला त्यांनी

१०. B. S. O. S. Vol. 1, No. 3, P. 57.

मराठीचें सुसंस्कृत स्वरूप पार पालटलें. उदा० गी, वान् , दान् , खाना असे कितीतरी प्रत्यय मराठी शब्दांना लागून पोटगी, गाडीवान्, दीपदान्, कारखाना असे नवीन घेडगुजरी शब्द बनले. त्यांत एकाच अर्थाचे फार्शी व मराठी शब्द वापरून जोडशब्द तयार होऊं लागले. उदा० घरदार, कागदपत्र, शेतजमीन वगैरे. इतकेंच नव्हे तर, जानराव, सुलतानराव, बाजीराव, शहाजी, फिरंगोजी अशीं विशेषनामें व सौदागर, सराफ, फडणीस, चिटणीस इत्यादि आडनांवें रूढ झालीं व राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे “ भ्रष्टपणाची कमाल झाली. ”[११]

परंतु फार्शीच्या संसर्गाने झालेला मराठीचा भ्रष्टपणा एवढ्याने संपला नाही. परंपरेने प्राप्त झालेलें जें प्रत्ययी स्वरूप मराठीने पुष्कळ प्रमाणांत टिकविलें होतें, त्या प्रत्ययी स्वरूपांतहि फार्शीच्या प्रत्ययप्रक्रियेने परिणाम केला. उदाहरणार्थ ‘रा’ ह्या फार्शी प्रत्ययावरून मराठींत ‘ ला ’ प्रत्यय आला व तो द्वितीया विभक्तींत लागू लागला. ‘ ला ’ प्रत्ययाच्या व्युत्पत्तीबद्दल जरी कांही मतभेद असला व ‘ लग् ’ पासून तो उत्पन्न झाल्याचें बीम्सने नमूद केलें असलें, तरी तो यादवकाळांत आढळत नाही. तेव्हा तदनंतर मराठींत असलेल्या ‘ ला’चा संबंध फार्शी ‘ रा ’ कडे लागणें असंभवनीय नाही. ‘ला’ प्रत्यय निदान इतर विभक्तिप्रत्ययांप्रमाणे नामाच्या वा सर्वनामाच्या पुढे लागतो. परंतु फार्शीतून आलेला षष्ठीचा ( इसाफत ) ‘इ ’ हा प्रत्यय मराठींत नामसर्वनामांच्या मागे लागतो. उदा० ‘ मौजे उझार्डे किल्ले वंदन= मौजा इ उझार्डे, किल्ला इ वंदन’. येथे इ उझार्डे = उझार्ड्याचें ( गाव ), इ वंदन = वंदनचा (किल्ला). षष्ठीच्या या (इ) प्रत्ययाप्रमाणे दर, ता, बे, सवाई इत्यादि फार्शी शब्दयोगी अव्ययेंहि नामांच्यामागे लागू लागलीं. उदा० दरशेकडा ( = शेकड्यांत ), मुंबई तें पुणें ( = मुंबईपासून पुणें ), बेभरंवसा ( = भरंवश्यावाचून ), सवाई माधवराव, ( = माधवरावासारखा). किंबहुना एकाच अर्थाचीं फार्शी व मराठी शब्दयोगी अव्ययें वा विभक्तिप्रत्यय नामांना लावण्याची पद्धति रूढ झाली. उदा० मी दर दिवशीं चार कोस चालतो. येथे ‘ दर ’ व ई हे दोन्ही सप्तमीचाच अर्थ व्यक्त करतात. हे झाले मराठीच्या फार्शीकरणाचे कांही प्रकार. पण याहीपेक्षा अधिक गंभीर स्वरूपाचा प्रकार म्हणजे फार्शीच्या धर्तीवर मराठी प्रयोग करणें. उदा. हाक मारणें, शफत खाणें, याद राखणें. हे प्रयोग बांग जदन्, कसम् खुर्दन् व याद दाश्तन् यांच्या चालीवर केले गेले आहेत.

सारांश, भिन्न स्वभावाच्या ( आणि त्यांतहि राज्यकर्त्यांच्या आधारानें मराठी जीवनाची सर्व क्षेत्रें व्यापूं पाहणाऱ्या ) फार्शीचा संसर्ग मराठीला मारक ठरणें अशक्य नव्हतें; परंतु मराठी तशांतूनहि निभावून निघाली. आलेलें गंडांतर तिने परतविलें—नव्हे पचविलें. याला अर्थात् इतर सहायभूत कारणें घडलीं हें खरें; परंतु त्या कारणांची मात्रा लागू पडण्याइतपत ती टिकून राहिली होती आणि तीहि आपल्या जन्मजात प्रकृतिधर्मामुळे हें मान्य केलेंच पाहिजे. फार्शीच्या संसर्गाने तिचें रंगरूप पालटलें, पण नांव पालटलें नाही. अवस्थांतर घडलें, पण नामांतर झालें नाही. किंबहुना फार्शीची संगत तिला मानवली. किती तरी नवीन शब्द वा नवीन नवीन प्रयोग तिने आत्मसात् केले. संतमहंत आणि पंडित कवि यांच्याकडून गीर्वाणवाणीचें स्तन्य तिला लाभतच होतें. त्यांत सरकारी कारभारांत वा बाजारहाटांत फार्शीकडून मिळणाऱ्या खुराकाची भर पडली; आणि अभिव्यक्तीच्या कितीतरी नवीन तऱ्हा घेऊन ती पुढे निघाली.

११. यासंबंधीच्या अधिक विस्तृत विवेचनासाठी पाहा : वि. का. राजवाडे—‘प्रस्तावनाखंड’ खंड ८ वा.

अनुक्रमणिका

मराठीचें अवस्थांतर होण्याचा आणखी एक प्रसंग आला तो इंग्रजी राजवट सुरू झाल्यावर. इंग्रजी भाषा नुसतीच अधिक समृद्ध नव्हे, तर प्रवृत्तीने मराठीहून सर्वस्वीं भिन्न. जुनें प्रत्ययी स्वरूप तिने जवळजवळ टाकून दिलें आहे. ती आता सामासिक झाली आहे. अशा भाषेचा जबरदस्त संबंध येतांच भिन्न प्रकृतीच्या आणि पुनः जितांच्या मराठींत अनेक भाषादोष न शिरते तरच नवल. मराठींत शिरलेल्या भाषादूषणांचीं अनेक उदाहरणें विष्णुशास्त्रींनी आपल्या निबंधांतून दिलीं आहेत. परंतु तीं दूषणेंहि आज भूषणें झालीं आहेत; म्हणजे ते दोषहि मराठीने पचविले आहेत, असें म्हटलें पाहिजे. अर्थात् येथेहि मराठीच्या शिवाजीने व त्याच्या अनुयायांनी संस्कृतीकरणाच्या मात्रेचे वळसे तिला सतत दिले हें लक्षांत घेतलें पाहिजे. परंतु कारणें कांहीहि असोत मराठीचें बाह्य रंगरूप पालटलें, तरी नामांतर करूं शकेल असें अवस्थांतर अजून तरी झालेलें नाही. मराठी भाषेची प्रवृत्ति जी तिच्या जन्माच्या वेळीं होती, तीच अजूनहि आहे; अर्थात् कालमानाने तिच्यांत थोडाफार बदल झालेला आहे, व हळूहळू सामासिक होण्याकडे तिचा कलहि दिसतो आहे; परंतु त्याचा दृश्य व मूलभूत असा परिणाम अजून तरी झालेला नाही. मराठी ही अजूनहि—तिच्या जन्माला आज आठशे-साडेआठशे वर्षे होत आलीं असलीं तरी—'मराठी' याच नांवाने ओळखिली जात आहे. ● ● ●

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय

## एशिया फौंडेशन अभ्यासवृत्ति

मुं. म. ग्रंथसंग्रहालयाच्या मार्फत एशिया फौंडेशन निधीमधून द्यावयाच्या दोन अभ्यासवृत्तींसाठीं डॉ. मु. ग. पानसे ( पुणें ) व श्री. शंकर पाटील ( पुणें ) या दोघांची निवड करण्यांत आली असून या उभयतांना प्रतिमासीं प्रत्येकीं रु. ५०० अभ्यासवृत्ती मिळेल. येत्या महिन्यापासून या उभयतांच्या अभ्यासास सुरवात होईल. डॉ. पानसे यांच्या अभ्यासाचा विषय "यादवकालीन महाराष्ट्राचा सामाजिक इतिहास" ( इ. स. १००० ते १३५० ) असा असून श्री. शंकर पाटील यांचें लेखन ललित स्वरूपाचें राहील, असें कार्यवाह कळवितात.

न. शे. पोहनेरकर

# वेरूळच्या लेण्यांत हसन गंगू बहामनी

अतिप्राचीन काळापासून वेरूळ आणि अजिंठा येथील लेणीं, भारतांतच नव्हे तर परदेशांतूनहि प्रसिद्ध आहेत. अनेक परदेशी प्रवाशांनी आपापल्या प्रवासवर्णनांत या कलाकृतींचा धन्यतापूर्वक उल्लेख करून ठेविलेला आहे. मात्र या कलामंदिरांच्या पंचक्रोशींत व परिसरांत ज्या ज्या राजाचें आगमन आणि निवास कारणपरत्वे होत गेले त्या त्या व्यक्तींनी कधी या असामान्य शिल्पवैभवाची दखल घेतली असल्याचें दिसत नाही. यादवांच्या अमदानींत श्रीघृष्णेश्वराची उपासना होत होती, परंतु कलावंताच्या एकनिष्ठेने आणि दृढपरिश्रमाने, तेथून दोन मैलांच्या आंत असलेल्या या कलापूर्ण कैलासाची मात्र विचारपूस तितकीशी होतांना दिसत नाही. मराठ्यांची राजवट, मोगलांची अमदानी, औरंगजेबाचा निवास अशा कितीतरी गोष्टी घडल्या, पण कुणाच्याहि आस्थेवाईक कलाप्रेमांत या लेण्यांना स्थान लाभलेलें दिसत नाही. तसा कांही उल्लेख जुन्या लिखाणांतून सापडला असता तर तितक्या जुन्या काळीं प्रस्तुतच्या लेण्या कोणत्या स्वरूपांत होत्या, त्यासंबंधी लोकांच्या उक्ति काय होत्या, आख्यायिकांतून कोणती माहिती मिळत असे, याची कांही तरी कल्पना करतां आली असती. परंतु दुर्दैवाने या पंचक्रोशींतील कुणाहि राजपुरुषाने या महान् कलाकृतीची योग्य ती दखल घेतलेली दिसत नाही.

याला नाही म्हणावयाला एक मात्र अपवाद आहे. दौलताबादच्या किल्ल्यावर हसन गंगू बहामनी याने ७४८ हिजरींत मुसलमानी राज्याची दक्षिणेंत सर्वप्रथम स्थापना केली. त्यानंतर त्याने मात्र या लेण्यांची दखल घेतली असा उल्लेख एका मुसलमान इतिहासकाराने करून ठेवला आहे. अशा प्रकारचे उल्लेख अतिशय कमी, छे नाहीतच म्हणून हा प्रसंग थोड्याशा तपशिलाने आज सांगावयाचा आहे.

हसन गंगूच्या राज्याभिषेकानंतर पांच वर्षांनी एके दिवशीं त्याच्या दरबारी श्रेष्ठींनी त्याला विनंती केली की वेरूळच्या डोंगरांत, जुन्या राजवंशांनी तयार करून ठेविलेलीं कलापूर्ण, आश्चर्यकारक अशा प्रकारचीं शिल्पमंदिरें आहेत. त्यांची कला एक वेळ बघण्यासारखी निश्चित आहे. स्वारीची इच्छा असल्यास तेथील सहलीचा बेत टरवावयाला हरकत नाही. श्रेष्ठींच्या आग्रहपूर्वक विनंतीला हसनने रुकार दिला. एक दिवस या सहलीसाठी निश्चित केला. रस्ते स्वच्छ करण्यांत आले. लेण्यांची सफाई केली गेली. सर्व प्रकारें स्वच्छता झाल्यावर तेथे मुक्कामाच्या सोईसाठी राजशाही शामियाने टाकण्यांत आले. ही सर्व सिद्धता झाल्यावर बुधवार, २५ शव्वाल ७५३ हिजरी रोजीं हा बहामनी शहा आपल्या सर्व दरबारी श्रेष्ठी आणि सरदारांसुद्धा तेथे जाऊन उतरला. लेणीं पाहून आणि त्यांतील प्रत्येक मूर्ति बघून सर्व आश्चर्यचकित झाले. ज्या कलावंतांनी हीं अमरमंदिरें उठविलीं त्यांच्या अप्रतिम कलेची मुक्तकंठाने स्तुति करूं लागले. हीं लेणीं कशीं आणि कोणीं खोदलीं असतील याविषयी अनेकांचे अनेक तर्क तेथे चालूं लागले. कोणाच्या मतें कोठूनतरी दरदी कलावान् येथे आले असतील, कोणी म्हणे चीन आणि तार्तर प्रदेशांतील कलावंतांचें हें कृत्य आहे. कांही म्हणूं लागले की जुन्या काळीं भारतांत शिल्पकला चांगलीच ऊर्जितावस्थेला पोहोचली होती. मूर्ति-

पूजेमुळे अनेक उपासनामंदिरें येथे प्राचीन काळापासून बनतच होतीं. त्याच कलेचा परमोच्च विकास या लेण्यांच्या रूपाने झालेला आपणांस पाहावयाला मिळतो. मात्र या कला सार्वत्रिक नव्हत्या आणि हे कलावंतहि सर्वसामान्य नव्हते. एकाच घरांत पिढ्यान्‌पिढ्या या कलेची जोपासना, एकनिष्ठेने आणि परिश्रमपूर्वक होत असे. कलेचें शिक्षण आपल्या मुलाबाळांपुरतेंच मर्यादित ठेवल्याने प्रत्येक गोष्ट प्रात्यक्षिक ज्ञानाने शिकली जाई. आपल्या कलेची माहिती एखाद्या ग्रंथांत नोंदविली जावी ही कल्पनादेखील कधी कोणाच्या मनांत आली नाही. आपापल्या मुलाबाळांना आपल्याजवळील संपूर्ण कला दिली की काम संपलें. अर्थात्, ग्रंथाची आवश्यकता त्यांना कधीच वाटली नाही. हत्यारें, रंग, रोगण या सर्वांची माहिती त्यांच्या डोक्यांत असे. अशा प्रकारामुळेच, ग्रंथाभावीं ही कला येथून नाहीशी झाली असें कांहींचें म्हणणें पडलें. दुसरे कांही म्हणत, केवळ असेंच नव्हे. हिंदूंच्या प्राचीन धार्मिक भाषेंत–संस्कृतांत–अशा प्रकारचा ग्रंथ अवश्य असावयाला हवा आहे आणि तो असावा. कालांतराने संस्कृत भाषा जशी व्यवहारांतून गेली तशाच प्रकारें अनेक ग्रंथहि नामशेष झाले; आणि त्यांतच या शिल्पकलेच्या ग्रंथांचीहि विल्हेवाट लागली असावी. अशा प्रकारें अनेकांचे अनेक तर्क. एकापुढे एक लेणीं पाहत जात असतांना प्रसंगवशात् उद्भवणारे हे विचार ! कैक लेण्यांतून खांब, भिंती, दारें यांच्यावर लेखहि खोदलेले दिसले. संस्कृत जाणणाऱ्या लोकांना तेथे मुद्दाम आणून या लेखांचें वाचन करण्याचाहि उपक्रम करण्यांत आला. काळाच्या प्रदीर्घतेने अक्षरांची दुर्दशा झालेली होती. बरोबर वाचणें अशक्य होतें. लेखाचा अर्थ जाणणें कठीण होतें. अत्यंत कष्टाने एका लेखाचें वाचन करण्यांत आलें त्याचा भावार्थ असा :

कलामंदिराचा निर्माता म्हणतो – लेखांतील मजकूर असा की –" या इमारती, राजदरबार आणि लवाजमा यांच्यासुद्धा, मी यासाठी बनविल्या की भावीकाळांत आमच्या वंशजांपैकीं जे कोणी येथे येऊन या इमारती पाहतील त्यांनी आमची आठवण सद्‌भावनेने करावी. आमचें ऐश्वर्य व वैभव आणि उत्कर्ष व अपकर्ष यांच्या हकीगती पाहून सृष्टीच्या अस्थिरतेच्या जाणिवेने योग्य तो धडा शिकावा. जगाच्या ऐषआराम आणि सुखविलासावर लुब्ध होऊं नये. न्याय, नीति आणि सहानुभव व सत्कार्य यांवर अनुरक्त व्हावें. अशाने जगांत त्यांना सत्कीर्ति मिळेल आणि शेवटीं आपापल्या कर्माप्रमाणे फल प्राप्त होईल. भविष्यकाळांत कुणा एखाद्या न्यायी आणि अधिकारी व्यक्तीला अशीं मंदिरें बनविण्याची इच्छा झाल्यास त्याला सांगा की, आरंभीं शिल्पकलेंत निष्णात आणि अनुभवी असे वीस हजार कलावान् एकत्र करावे आणि अशांच्याकडून एक सहस्र वर्ष अखंडित काम घ्यावें. या कलामंदिरासाठी राजकोषाचीं द्वारें खुलीं करावीं आणि शेवटपर्यंत काम चिकाटीने चालवावें म्हणजेच कदाचित् अशी कलाकृति पुन्हा साकारणें शक्य आहे. त्याच्या जीवनाची ती महान् स्मृति ठरेल." येथे शिलालेखाचा मजकूर संपला. येथे तो इतिहासलेखक लिहितो, शिलालेखाच्या मजकुरावरून दिसतें की, या मंदिराच्या निर्मात्याला याची प्रतिकृति अशक्यप्राय वाटत होती; आणि म्हणूनच हसन गंगू आणि त्याचे दरबारी सरदार-उमराव या कलाकृतीची सारखी स्तुति करूं लागले. त्या काळीं असणारी संपत्तीची लयलूट आणि ब्राह्मणांच्या शक्तिबुद्धीच्या दिव्यतेजाकडे पाहून ते आश्चर्यमूढ झाले. प्रत्येक ठिकाणचें नक्षीकाम आणि राजदरबारची सजावट पाहून त्यांची मति गुंग झाली. ते प्रत्येक लेण्यांत जात. तेथील मूर्ति, शिल्प, प्रमाणबद्धता, भावदर्शन बघत आणि स्वतः मूर्ति बनून जात.

हसन गंगू वेरूळचीं लेणीं पाहत आणि करमणुकीची सहल करीत तेथील उत्साहवर्धक वातावरणांत एक आठवडा राहिला. त्या वेळीं या मूर्तिमंदिरांची रांग अंजिठ्यापर्यंत होती.

मात्र मधून मधून बहुतेकांची मोडतोड आणि पडझड झालेली होती. अनंत काळापासून दुर्लक्षिल्यामुळे त्यांना दुरुस्तीची आवश्यकता भासूं लागली होती. आज अशा १४ किंवा १५ इमारती अस्तित्वांत आहेत.

तोइफ-ई-उल-मुल्क या इतिहासाचा लेखक रफीउद्दीन शिराजी असें लिहितो की, हिंदूंच्या इतिहासग्रंथांवरून असें दिसतें की, दक्षिणेंत प्रचंडराय या नांवाचा एक महाराजा होता. गुजराथ, दक्षिण व तेलंगण यांपासून मलबार कोकणपर्यंत पूर्ण प्रदेशावर त्याचें राज्य होतें. दक्षिण आणि कोकणचे राजे त्याचे आज्ञापालक आणि खंडणी भरणारे होते. स्वतः महाराजा न्यायी, आनंदी, प्रेमळ आणि सदाचारी होता. सैन्य आणि प्रजा दोघांनाहि त्याच्या सावलींत शांततेने जीवन जगतां येत होतें. कोणालाहि कसलीहि काळजी वाटत नसे. महाराजा वसंतऋतूंत आपल्या राज्याची पाहणी करण्यास निघत असे. प्रजेला हरप्रकारें संतोष देण्यांत तो दक्ष असे. योग्य जमीन आणि पाणी पाहून तेथे तलाव आणि इमारती बांधीत असे. ठिकठिकाणीं देवळें आणि इमारती उठवून देत असे. या काळांत शिल्पकला अतिशय उच्च कोटीला पोहोचली होती. आजतागायत यांच्या अवशेषांनी ही गोष्ट सहज लक्षांत येऊं शकते. आजहि अस्तित्वांत असलेल्या या अवशेषांना जुनेपणा आला असेल, परंतु त्यांचें कलामूल्य मात्र आहे तसेंच आहे. धारानगर-देवगड-दौलताबाद ही त्या महाराजाची राजधानी होती. याच महाराजाच्या वंशांतील राजा देवरावने याचें नांव देवगड ठेविलें आणि तघलख् बादशहाने दौलताबाद व मलिकंबराच्या फत्तेखान याच्या मुलाने याचेंच नांव फत्तेबाद असें ठेविलें. प्रचंडरायाच्या काळीं धारानगर अतिशय सुप्रसिद्ध असें शहर होतें. रेशमी, मखमली, जरतारी, हिमरु, मशरु अशा अनेक प्रकारच्या कापडाचे येथे कैक कारखाने होते. मलमल, लुगडीं, शाली या अतिशय उत्कृष्ट अशा तयार होत याच्या जवळपासच्या गावांतून आणि कसब्यांतून या विणकामाचे कारखाने होते. पाण्याचा सुकाळ असल्यामुळे शहरापासून चार चार मैल लांब बागा बहरलेल्या दिसत असत द्राक्षें, सेव, अंजीर, संत्रीं, लिंबू, आंबे हीं फळें पुष्कळ होत व अतिशय स्वस्त असत. येथील कलावस्तूंना चीन, अरबस्तान, समरकंद, काशगर, लाहोर आणि दिल्ली येथील बाजारपेठांतून चांगलीच मागणी असल्याने तेथील व्यापारी येथे नेहमीच येत जात असत. दक्षिणेचा हा व्यापार आणि राजाची उदार बुद्धि यांची कीर्ति फार दूरवर पसरलेली असे. ठिकठिकाणचे विद्वान् आणि कलावान् याचसाठी नेहमी येथे येत आणि आपल्या गुणाचें योग्य तें चीज झालेलें पाहून धन्यता मानीत असत. शहराच्या बाहेरहि कित्येक मैल लोकवस्ती वसलेली असे. पाहाल तिकडे माणसें, जनावरें यांची हालचाल आणि जा-ये दिसत असे. प्रचंडराय हा विद्याप्रेमी असून त्याच्याजवळ विद्वान्, ज्योतिषी, गणिती आणि शास्त्रज्ञ असत. शिल्पकार, विणकर यांचीहि तो बूज राखीत असे. त्याच्या विद्वत्प्रेमाने कैक विद्वानांना तेथे आकर्षून आणलें होतें. काश्मीरचे पंडित, सिंधचे ज्योतिषी व गणिती, चीनचे शिल्पकार आणि इजिप्तचे विणकर याच्या पदरीं येऊन राहिले होते. कलाशिक्षणाच्या शाळा उघडण्यांत आल्या होत्या. राजक्रांत्यांच्या उलाढालींत शाळा बंद पडल्या, पण आपल्या घरापुरत्या खाजगी शाळा या कधीच बंद पडल्या नाहीत. इतरांचा त्यांत लाभ नसला तरी आपली विद्या आणि कला आपल्या घराण्यांत पूर्णतया अभ्यासली जावी ही काळजी प्रत्येक घराणें घेई. भारतांत कला सार्वत्रिक आढळत नाहीत त्याचें हें एक महत्त्वाचें कारण आहे.

एके दिवशीं आपल्या दरबारांत बसला असतांना प्रचंडराय म्हणाला की, आजपर्यंत मीं अनेक देवळें आणि इमारती बांधल्या; परंतु चिरकाल टिकून आपल्या कलेचें दिग्दर्शन

देऊं शकेल अशी त्यांत एकहि नाहीं. दरबारांत अनेक शिल्पशास्त्री आणि कलावंत होते' त्यांनी एकमुखाने सांगितलें की " महाराज ! या नगराभोवतीं असणारा पर्वत आणि त्याचा पाषाण हा फार वैशिष्ट्यपूर्ण आणि दुर्मीळ असा आहे. त्यांत कुठेच भेगा किंवा तडा पडलेल्या नाहीत. धोंडा घट्ट आणि साफ आहे, खेरीज मऊ आणि स्वच्छ आहे. या डोंगरांत अशा-प्रकारची भव्य इमारत उठवावी की तींत आठ राजे आपल्या लवाजम्यासुद्धा सामावूं शकतील. खोल्या वगैरेची अशी सोय असावी की कुणालाहि दुसऱ्या इमारतीची आवश्यकता भासूं नये. प्रत्येक ठिकाणीं मनुष्य आणि प्राणी यांच्या आकृति असाव्या. राजकीय वैभवाचें दर्शन त्यांत घडावें. मूर्ति घडवितांना देखील लहानमोठ्या अशा न करतांना मानवी आकृति डोळ्यांपुढे ठेवूनच घडवाव्या. अशी इमारत आपल्या राजवटीचें आदर्श स्मारक आणि भावी पिढ्यांना प्रेरणादायक म्हणून मोलाची ठरेल. जगाची नश्वरता आणि आपलें ऐश्वर्य आणि कलाप्रेम यांचें महान् प्रतीक म्हणून सर्वांना तें महान् आश्चर्य भासेल. पांचा मुखीं परमेश्वर. " महाराजांना हें ऐकून विशेष वाटलें; आणि कदाचित् असें झालें तर अहं-विशेष अशी भावना साहाजिकच झाली. मात्र ही भावी इमारत कशीकाय होणार याचें मेणाचें प्रात्यक्षिक आधी पाहावें अशी त्यांनी इच्छा प्रदर्शित केली. त्याप्रमाणे एक नमुना करून दाखविण्यांत आला. तो पसंत पडल्यावर वेरूळच्या डोंगरांत काम करण्याची राजाज्ञा मिळाली.

कलावंत कामाला लागले आणि तेथील पाषाण हळूहळू आकार धारण करूं लागला. आपल्या कलेंत प्राण ओतून त्यांचे हात तेथे काम करीत होते. त्याचेंच प्रत्यक्ष फळ म्हणजे आजहि काळाच्या संहारक शक्तीला हसत या कलाकृति आपलें अभंग अधिष्ठान निष्ठेने संभाळून आहेत.

हिन्दूंचीं देवळें एवढीच या लेण्यांची इतर राजपुरुषांनी किंमत केली; परंतु हसन गंगू बहामनी यानें मात्र या कलाकृतींची एक आठवडाभर पाहणी करून तेथील शिलालेखांचें यथाशक्य वाचन करण्याचाहि प्रयत्न केला हें त्याच्या गुणज्ञतेला यथायोग्यच आहे. अशा प्रकारें या कलाकृतींची आस्थेवाईकपणें इतर कोणीं पाहणी केल्याचें इतिहासांत नमूद नसल्याने या उल्लेखाचें महत्त्व आहे. ● ● ●

श्री. वसन्त स. जोशी, एम्. ए.

# मुक्तेश्वराचें भावार्थ रामायण

## उत्तरकांड

प्राचीन मराठी वाङ्मयांत 'कवि' या पदवीवर यथार्थतेने ज्याचा अधिकार सांगितला जातो, असा मुक्तेश्वर हा एकच कवि आहे.[१] संत कर्त्यांनी काव्य हें आपल्या भक्तीचें एक साधन मानलें आणि त्याच्याद्वारा आपल्या अंतःकरणांतील भावना त्यांनी व्यक्त केल्या. केवळ काव्यरचना करण्याच्या उद्देशाने ते लेखनप्रवृत्त झाले नव्हते. मोरोपंतासारख्या पंडित कवीने सुद्धा 'कांहीं तरावया गावें' असाच आपल्या काव्यरचनेचा उद्देश ठेवला होता. 'अमृतातें पैजा जिंकणारी' मृदुमवाळ शब्दरचना ज्ञानेश्वरांनीं 'भावार्थदीपिके'त केली असली, तरी त्यांची ग्रंथरचना गीतातत्त्वज्ञान सुगम करून सांगण्याकरितां झालेली होती. अर्थात् प्रतिभावंताचे गुण तींत आपोआपच उतरले आहेत. एकनाथांना तर प्रत्येक वस्तूंत अध्यात्मांची प्रचीती येत असे. मुक्तेश्वराने मात्र काव्यशब्दाच्या व्याख्यांना सार्थ ठरणारी निर्मिति केली. मुक्तेश्वर हा संत म्हणूनहि मानला जात नाही किंवा पंडित कवींतहि त्याची गणना करतां येणार नाही. सुंदर आणि समर्पक शब्दरचना करून उत्कृष्ट रसाविष्कार त्याने आपल्या काव्यांत साधला आहे. त्यांत भक्तीचाहि कांहीं ठिकाणीं आढळ होत असला, तरी तें त्याचें एकमेव उद्दिष्ट नव्हतें. श्रोत्यांच्या आणि पर्यायाने वाचकांच्या चित्तसमाधानासाठी त्याने तें काव्य लिहिलें. केवळ संस्कृताचा मराठींत अनुवाद करण्याचीहि त्याची भावना नव्हती. त्याच्या काव्यांत त्याचें स्वतःचें व्यक्तिमत्त्व उमटलेलें आहे. त्याचीं विशिष्ट रूपकें, निसर्ग व प्रसंग-वर्णनें हीं त्याचीं 'स्वतःचीं' आहेत. तत्कालीन समाजाचें आपल्या आजोबाप्रमाणेच त्याने घडविलेलें दर्शन त्याच्या काव्याचें वेगळेपण दाखवितें. परंपरागत उपमादृष्टान्तांना त्याने कवटाळलेलें नसून नवनवीन प्रतिमा त्याने निर्माण केल्या आहेत. राधाकृष्णांच्या रूपाने स्वतःची भक्तिभावना संतकवि व्यक्त करीत. मुक्तेश्वराने महाभारताच्याद्वारे स्वतःच्या अंतःकरणांतील उचंबळणाऱ्या भावनांना वाट करून दिली आहे. तत्कालीन समाजावर तो कोरडे ओढतो. सर्वत्र चाललेल्या जुलमांचें चित्रण करतो आणि हें करीत असतांना तो वास्तवाचें इतकें स्पष्ट चित्रण करतो की, त्याला अश्लीलतेचा वास यावा. परंतु मुक्तेश्वर हा निरागस वृत्तीचा, स्पष्टवक्ता कवि होता. त्याच्या अंतःकरणांत खोलवर रुजलेल्या भावभावनांचीं आणि अनुभवलेल्या प्रसंगांचीं हुबेहूब चित्रें त्याने आपल्या काव्यांत रेखाटलीं आहेत. काव्याच्या वृत्तनियमादि बंधनांचें जोखडहि त्याला मानवण्यासारखें नव्हतें. हें बंधन तोडण्याचा बंडखोरपणा त्याने 'संक्षेप रामायणा' सारख्या सुरवातीच्या कृतींतच केलेला दिसतो आणि म्हणूनच ओवी हा सुटसुटीत छंद त्याने पसंत केला असावा.

---

१. श्री मुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।
बंदी लक्ष जयाचें यश ज्याचें भव्य जेंवि मंदील ॥

—मोरोपंत ( सन्मणिमाला )

कांहीं असभ्य वाटणारीं उदाहरणें मुक्तेश्वराच्या काव्यांत आहेत. त्यावरून त्याचें व त्याच्या वडिलांचें चरित्र अजमावण्याचा वि. ल. भावे यांचा प्रयत्न अनुचित आहे. श्लील आणि अश्लीलत्वाच्या कल्पना कालसापेक्ष असतात. मुक्तेश्वरावर गहजब उडविण्यासारखें कांहीं नसून तो एक रसिक कवि होता. उदाहरणार्थ भावार्थ रामायणाच्या या उत्तरकांडांत कांहीं अश्लील प्रसंगांचा त्याने उल्लेख केला आहे. असे तत्कालीन समाजांत घडणारे प्रसंग-सुद्धा त्याने काव्यांत चित्रित केले असण्याचा संभव आहे. यांत वास्तवाशीं त्याने इमान राखल्याचेंच दिसून येतें व त्यामुळें मूळ काव्यभागाला उठावहि आला आहे. मात्र हें वर्णन करीत असतांना आपल्याकडून कालविपर्यासाचा दोष घडतो आहे इकडे त्याचें लक्ष नाहीं. इतर संत किंवा पंत कवींप्रमाणे तो भाविकतेच्या किंवा अध्यात्मप्रवणतेच्या अवडंबरांत गुरफटत गेला नसून, एक संवेदनाक्षम कवि म्हणून आपलें वैशिष्ट्य त्याने निर्माण केलें आहे. म्हणून त्याला संतपंतांच्या मालिकेंत न बसवितां एक अत्यंत रसिक, संवेदनाक्षम आणि वास्तवाशीं इमान राखणारा कलाकवि म्हणणेंच योग्य ठरेल. मुक्तेश्वराचें मन कवीचें होतें, वृत्ति रसिकाची होती आणि दृष्टि वास्तववाद्याची होती. ठाकठिकीची आणि मनोवेधक रचना हें त्याचें महत्त्वाचें वैशिष्ट्य. गबाळेपणा किंवा अस्ताव्यस्तपणा त्याला बिलकुल पसंत नाहीं. ढोंगावर तडाखे देण्यांत तो मागेपुढे पाहत नाहीं. आपली कथा ऐकणाऱ्या श्रोत्यांनासुद्धा 'ताम्र नाणें देऊन कथासुवर्ण लुटणारे' असा टोमणा मारण्यास तो कमी करीत नाहीं. रामायण असो किंवा महाभारत असो, कथानायकाच्या विभूतिमत्त्वाने भारून जाऊन त्याची वेळींअवेळीं स्तुति करण्याची पद्धत मुक्तेश्वराने स्वीकारलेली नाहीं. उलट रामाची भक्ति करणाऱ्या शंकराचीच स्तुति त्याने वारंवार केल्याचें या उत्तरकांडांत व अन्यत्रहि आढळून येतें. सोनारीचा भैरव हें त्याचें उपास्य दैवत असल्याचा हा परिणाम असावा. ज्या ज्या ठिकाणीं वाव मिळेल त्या त्या ठिकाणीं मुक्तेश्वराने मुक्तहस्ताने आपल्या कवित्वाची पखरण केली आहे. कांहीं वेळां तें कथानकाच्या परिपोषाला उपकारकच ठरतें. रामायण किंवा महाभारतांतील अवाढव्य कथानकें थोडक्यांत आणून बसवितांना लहानशा हस्तिदंती तुकड्यावर सुबक नक्षीकाम करणाऱ्या कलावंताचेंच कार्य त्याने केलें आहे. तो एक जातिवंत कलाकवि होता. परिणामैक्य साधण्यासाठीं अवास्तवतेला किंवा फापटपसाऱ्याला वाव देऊन चालत नाहीं आणि याच दृष्टीने नको तो भाग सोडून देऊन, हवा तेवढाच घेऊन व कांहीं नवी भर घालून त्याने खऱ्या कलावंताचेंच कार्य केलें आहे, असें म्हटलें पाहिजे.

मुक्तेश्वराच्या अप्रतिम काव्यविलासाची ओळख त्याच्या महाभारतपर्वांवरून होते. पण महाभारताची रचना होण्यापूर्वींची त्याची रचना मला उपलब्ध झाली आहे. श्रीएकनाथांच्या 'भावार्थ रामायणाचें' गावबाकृत उत्तरकांड आजपर्यंत आपण वाचीत आलों आहों. पण मुक्तेश्वरानेहि उत्तरकांडरचनेचा प्रयत्न केल्याची कोणास कल्पना नव्हती. श्रीएकनाथांच्या 'भावार्थ रामायणाच्या हस्तलिखित प्रतींतच मुक्तेश्वरकृत उत्तरकांडाची संपूर्ण प्रत मला उपलब्ध झाली. ही कृति मुक्तेश्वराचीच की काय हें पाहण्याच्या दृष्टीने तिचा अभ्यास केला असतां, सुरवातीस सांगितलेल्या सर्व मुक्तेश्वरी वैशिष्ट्यांचा पुनः प्रत्यय आला.

मला उपलब्ध झालेल्या मुक्तेश्वरकृत उत्तरकांडाचे एकूण अध्याय अठरा आहेत. त्याच्या प्रत्येक भारतपर्वांतहि अठरा अध्याय आहेत. या उत्तरकांडांतील अध्यायांचीं नांवें व ओवीसंख्या अशी आहे:— कंसांतील आंकडे त्या अध्यायांतील ओवीसंख्या दर्शवितात. १. कुबेरजनन (७०), २. माळीसुमाळीनिग्रहण (१२५), ३. कुबेरनिबर्हण (१६७), ४. रावणविटंबनं (१४१), ५. रावणमानभंग (१४३), ६. रावणइंद्रजय (१३०),

७. बिभीषणलंकागमन ( १०० ), ८. सीतापरित्याग ( १७० ), ९. श्वानउद्धरण (१७५), १०. कुशलवजनन ( १४६ ), ११. दंडकारण्योपाख्यान ( १५६ ), १२. लवनिग्रहण ( १४१ ), १३. लक्ष्मणआगमन ( ११० ), १४. सुमैत्रपराभव ( ६३ ), १५. श्रीरामविजय ( १२० ), १६. सीतापाताळप्रवेश (१९९), १७. लक्ष्मुमणनिर्याणं ( १२८ ), १८. श्रीरामनिजधामगमनं ( २०४ ), एकूण ओवीसंख्या २४८८.

या अठरा अध्यायांची रचना ' संक्षेप रामायणां 'तील पुढील श्लोकांनुसार करण्यांत आली आहे :

| संक्षेप रामायण उत्तरकांड श्लोक | हस्तलिखित उत्तरकांड अध्याय | ओवीसंख्या |
|---|---|---|
| १ ते १८ ( १८ ) | १ | ७० |
| १९ ते ३० ( १२ ) | २ | १२५ |
| ३१ ते ७१ ( ४१ ) | ३ | १६७ |
| ७२ ते १०३ ( ३१ ) | ४ | १४१ |
| १०४ ते १६१ ( ५८ ) | ५ | १४३ |
| १६२ ते २३३ ( ७२ ) | ६ | १३० |
| २३४ ते २९४ ( ६० ) | ७ | १०० |
| २९५ ते ३०७ ( १३ ) | ८ | १७० |
| ३०८ ते ३३३ ( २६ ) | ९ | १७५ |
| ३३४ ते ३५७ ( २४ ) | १० | १४६ |
| ३५८ ते ३९३ ( ३६ ) | ११ | १५६ |
| ३९४ ते ४३३ ( ४० ) | १२ | १४१ |
| ४३४ ते ४४८ ( १५ ) | १३ | ११० |
| ४४९ ते ४७५ ( २७ ) | १४ | ६३ |
| ४७६ ते ५२८ ( ५३ ) | १५ | १२० |
| ५२९ ते ५८० ( ५२ ) | १६ | १९९ |
| ५८१ ते ६१८ ( ३८ ) | १७ | १२८ |
| ६१९ ते ६५८ ( ४० ) | १८ | २०४ |

### मुक्तेश्वराच्या ओळखीच्या खुणा

मुक्तेश्वराच्या या अप्रसिद्ध उत्तरकांडाची माहिती देणारा माझा लेख ' रविवारच्या लोकसत्ते'त ( दि. २७।४।१९५८ ) प्रसिद्ध झाला होता. त्या लेखांतील विषयांची चर्चा मला येथे करावयाची नाही. पण मुक्तेश्वराचें या ग्रंथाचें कर्तृत्व सिद्ध होण्याकरिता या उत्तरकांडांतील पहिल्या ओवीचा विचार केला पाहिजे. ती ओवी अशी आहें :

ॐ नमो जनार्दनास्वामी । लिला विश्वंभर गुरुनामी ।
तुझीये पवित्र पादपद्मीं । मनोभृंग विश्रामी ॥ १ ॥

अशाच प्रकारची रचना मुक्तेश्वराच्या महाभारतपर्वांतूनहि आढळते. पाहा : ॐ नमोजी विश्वंभरास्वामी । तुझिये स्वरूप परब्रह्मीं । पंचायतन पंचनामीं । कल्पिजेती अवयव ॥१॥

( आदिपर्व, अध्याय १ )

लीला विश्वंभर पादाब्जीं । मुक्तेश्वर षट्पद सहजीं ।
गुंजारव करिती रुंझीं। भारतकथा प्रगटली ॥ १५४॥
(सभापर्व, अध्याय ३ )

तया आदिपुरुषा स्वामी सूनि मी । लीळा विश्वंभर गुरुनामी ।
नमस्कारूनि मनोधर्मीं । सावध ह्मणे श्रोतयां ॥ ३ ॥
( विराटपर्व, अध्याय १ )

'पादपद्म आणि मनोभृंग' ही मुक्तेश्वराची आवडतीं रूपकें आहेत. त्यांचा वापर संक्षेप रामायणांत त्याने अनेक ठिकाणीं केला आहे.[२] या सर्व ठिकाणीं असलेला या रूपकांचा उल्लेख व या उत्तरकांडांतील पहिल्याच ओवींतील त्याचा उल्लेख ही मुक्तेश्वराचीच कृति असल्याचें सिद्ध करतात. मुक्तेश्वराच्या वाङ्मयांत नेहमी आढळणारे 'युद्धकंदना मिसळले, खंडविखंड केले, दिव्यसुमनें वर्षले, हृदयस्फोट होतसे' असे विशिष्ट शब्दप्रयोग, 'अमरत्व निर्भयत्व । तिहीं लोकींचें आधिपत्य ।' किंवा 'छप्पन देशींचे राजेश्वर । शाण्णव कुळींचे राजकुमर' अशी रचना या उत्तरकांडांतहि वैपुल्याने आढळते. रूपकांची भरभार हें मुक्तेश्वरी शैलीचें महत्त्वाचें वैशिष्ट्य या ग्रंथांतहि प्रतीत होतें. मुक्तेश्वराचें वास्तव्य नृसिंहवाडीजवळ तेरवाड येथे होतें, हें प्रसिद्धच आहे. तत्संबंधीच्या या उत्तरकांडांतील शेवटच्या ओव्या अशा आहेत :

'यका जनार्दना शरण । उत्तरकांड रामायण । संतकृपेनें जाले पूर्ण । सकळ लोकां तारक ॥ २०१ ॥ पवित्र सरिता कृष्णावेणी । पंचगंगा संगमस्थानीं । नृसींव्ह सरस्वतीच्या चरणीं । ग्रंथ प्रगट लाधला ॥ २०२ ॥ तेथें जाली देववाणी । ग्रंथ पावला प्रतिष्टानि । यकनाथाचींये सदनीं । विस्तारेल जनमुखें ॥ २०३ ॥ (उत्तरकांड, अध्याय १८)

## ओवीचा स्वीकार

मुक्तेश्वराची कविता बंधनांतून वाट काढणारी नाही. मुक्तेश्वराच्या नांवाप्रमाणेच तीहि मुक्त आहे. तिचा स्वैरविलास वाचकांप्रमाणेच कवीलाहि प्रिय असावा. याचें प्रत्यंतर आपल्याला 'संक्षेप रामायण' व 'उत्तरकांड' यांची तुलना करतांना पदोपदीं येते. काव्याचा ओघ अप्रतिहत राहावा म्हणून अवजड वृत्तांचें बंधन त्याने मुळीच स्वीकारलेलें नाही. मालिनी, भुजंगप्रयात अशीं सोपीं वृत्तें, अनुष्टुभासारखा लोकप्रिय आणि 'कांहीं नेम नसे गणीं' असा छंद आणि पदांतून फटक्यासारखी रचना त्याने अनुसरलेली दिसते. संक्षेप-रामायणाची रचना ही केवळ श्लोकबद्ध काव्यनिर्मिति आहे. मूळ कथानक पद्यरसाने व नीटनेटकेपणाने त्यांत सांगितलें गेलें आहे. 'मातृजनक एकनाथांच्या' मार्गदर्शनाखाली ही रचना झाली असावी हें एकनाथांच्या कित्येक ओव्यांच्या अनुसरणावरून आणि 'कोण मुक्या हातीं रामायण वदवी' या मुक्तेश्वराच्या एकनाथावरील आरतींतील चरणावरून दिसून येतें.[३] मुक्तेश्वराची बहुसंख्य काव्यरचना ओवीबद्ध आहे. यावरून त्याने घेतलेल्या

२. पाहा:— संक्षेप रामायण – बालकांड ५४, ८४, ८५. अयोध्याकांड – ३९, ५३, १०९. अरण्यकांड – १५, ९१. युद्धकांड – १८, ४६, २४९, ४३१, ४७१. किष्किंधाकांड–२२. सुंदरकांड–४०.

३. मुक्तेश्वर हा आधी मुका होता आणि एकनाथांच्या कृपेने त्याला वाचा आली, अशी आख्यायिका आहे. परंतु एकनाथ हे असे चमत्कार करणारे साधु नव्हते. घरांतील मुलाचें नांव कौतुकाने 'प्रल्हाद'चें 'पल्या' किंवा 'चंद्रशेखर'चें 'चंदा' असें उच्चारलें

स्वातंत्र्यामुळे त्याच्या प्रतिभाविलासाला अधिक वाव मिळाला हें उघड आहे. काव्यरचनेच्या जाचक निर्बंधामुळे कवीची कल्पनाशक्ति गुदमरते व तिच्या स्वैरविलासास अडथळा येतो, यामुळे कोणतेंहि बंधन न पाळतां 'मुक्तछंदा'चाच वापर करण्याकडे अलीकडील कवींची प्रवृत्ति आहे. मुक्तेश्वरानेहि 'ओवी' हा सुटसुटीत छंद आपल्या काव्यरचनेसाठी स्वीकारला. 'संक्षेप रामायणां'तील काटकसरीची शब्दरचना आणि तिचाच 'उत्तरकांडां'तील स्वैरपणा पाहिला म्हणजे मुक्तेश्वराच्या या छंदांतील रचनेमुळे कसा ओघ व सौंदर्य प्राप्त झालें आहे याची कल्पना येते. मुक्तेश्वराचें 'संक्षेप रामायण' ही त्याच्या तारुण्यावस्थेंतील रचना आहे, हें सर्वमान्य आहे. याच संक्षेप रामायणाचें ओवीबद्ध रुपांतर मुक्तेश्वराने भावार्थ रामायणाच्या या उत्तरकांडांत केलें आहे. 'संक्षेप रामायणा'च्या उत्तरकांडाची श्लोकसंख्या ६५८ इतकी आहे, तर याच श्लोकांचा ओवीबद्ध उत्तरकांडांत २४८८ इतक्या ओव्यांत विस्तार करण्यांत आला आहे. 'संक्षेप रामायणा'ची व 'भावार्थ रामायण उत्तरकांडा'ची तुलना करीत असतांना 'उत्तरकांड' ही मुक्तेश्वराचीच कृति आहे, हें जसें सिद्ध होईल, तसेंच मुक्तेश्वराने आपल्या कल्पनाविहाराला योग्य अशीं स्थळें कोणतीं निवडलीं याचीहि कल्पना येईल.

### संक्षेप रामायण व उत्तरकांड यांची तुलना

संक्षेप रामायण व उत्तरकांड यांतील अतीव सादृश्य, त्यांची तुलना करुन पाहिली असतां, सहज लक्षांत येतें. कांही उदाहरणें पुढे देत आहे :

१. गरुडारूढ तो विष्णु लोक जिष्णू जगत्पती
धांवला विश्वकैवारा दुष्टभारा निवर्तक ॥ २६ ॥
सुदर्शन महाचक्रें दैत्यवक्त्रें द्विधा करी ॥ २७ ॥
शिरच्छेदियलें चक्रें जेंवि शक्रें महागिरी ॥ २८ ॥
पाठी देवोनिया सर्वी जात उर्वी त्यजोनिया
पाताळभुवना गेले गुप्त ठेले रसातळा ॥ २९ ॥

(संक्षेप रामायण)

गरुडारूढ कमळापती । सुदर्शन पराजिलें हातीं । असंख्यात विष्णुदुतीं । शस्त्रें अस्त्रें पराजिलीं ॥ ९२ ॥ चक्र प्रेरुनी वनमाळी । शीर छेदुनी पाडिला माळी ॥ ११४ ॥ गरुड चंचुचीये घारें । मारितां चूर्ण होतीं शिरें । जैसें पुर्वी वज्रधरें । पर्वतशिखरें छेदिलीं ॥११६॥ विष्णुचक्राचिये हव्यवाटी । राक्षस भस्म केले सात कोटी । ते वेळीं देउनीया पाटी । लंकादुर्गी रिघाले ॥ ११७ ॥ (उत्तरकांड, अध्याय २)

२. रावणबिभीषणादिकांच्या तपश्चर्येचें हें वर्णन पाहा :—
गोकर्णतीर्थी निर्धारीं सिंधुपारीं शिवालयीं
तपा आचरते झाले, भयें म्याले सुरालयीं ॥ ४६ ॥
संख्या दशसहस्रांची निर्जरांची रघूद्वहा
रावणाची तपश्चर्या तीव्र सूर्या न लक्षवे ॥ ४७ ॥
ग्रीष्मीं सेवीत पंचाग्नी मोघयानीं घनोदका ॥ ४९ ॥

---

जातें. तसेंच एकनाथांच्या या प्रतिभावंत नातवालाहि लहानपणीं 'मुक्या' असें संबोधलें जात असावें. एकनाथांकडून संबोधिल्या जाणाऱ्या या नांवाचा उल्लेख करून मुक्तेश्वराने एकनाथांच्या आपल्यावरील प्रेमाचीच कल्पना दिलेली आहे.

सीतकाळीं जळीं राहे सर्व साहे समाधिला
विभीषण सत्वसाधू एक पादू तळीं उभा ॥ ५० ॥
पंचसहस्र वर्षे हो करी पाही महात्तपा
' अमृतत्वा निर्भयत्वा आधिपत्या जगत्रयीं ॥
सर्वत्र विजयो देकां ' म्हणे ' घे कां दशग्रिवा ॥ ५३ ॥
बिभीषण म्हणे, ' देवा, विष्णुसेवा निरंतरा
धर्मीं सदा वसो बुद्धी ' तोषे विधि म्हणे, ' दिलें ' ॥ ५६ ॥
( संक्षेप रामायण )

अनुताप धरूनीया पोटीं । पश्चीम समुद्राचे तटीं । गोकर्णतीर्थी हो धुर्जटी। महाबळेश्वर वंदिला ॥ ५४ ॥ दाहा सहस्रें वरुषें नेम । दृढतेने मुनिसत्तम । निग्रहुनी इंद्रियधर्म । तपश्चर्या मांडिली ॥ ५६ ॥ द्वादश पंचाग्नीं उष्णकाळीं । जळाशय शीतकाळीं । मेघवृष्टी वर्षावकाळीं । चारी मास वें माया ॥ ५७ ॥ पांच सहस्र यक चरणीं । पांच सहस्र विलोकी तरणी । विभीषण अनुष्टानी तपश्चर्या आचरे ॥ ६० ॥ अमरत्व निर्भयत्व । तिनीं लोकींचें आधीपत्य । मागता सत्यलोकनाथ । ' घे घें ' म्हणे विवाचा ॥ ६७ ॥ विभीषण विनवी विनयशब्दीं । सदा धर्मीं वसोदे बुद्धी । भूतदया चित्त शुद्धी । सत्य वाचा वसो दे ॥ ७० ॥ विष्णुभजनीं चढतें प्रेम । सदा वाचे अच्युतनाम । जीवमात्रीं पुरुषोत्तम । सर्वव्यापी भज भासे ॥ ७१ ॥ ( उत्तरकांड, अध्याय ३ )

३. उत्तरकांडाच्या पांचव्या अध्यायांतील कांही भाग पाहा :

विस्मय करावया पुरा । कारण नाही नरेस्वरा ।
नानारत्ना वसुंधरा । बोलती ते यथार्थ ॥ ४ ॥
विस्मयासी नसे स्याना । बहुरत्ना वसुंधरा ॥ १०२ ॥
( संक्षेप रामायण )

तारु वानर बळें संपन्न । मुख्य वाळीचा प्रधान । ह्मणे अवंतुया मरण । पाचारिसी काशीया ॥ १६॥ अचाट वाळिचा पुरुषार्था । उपमाने देवे कृतांता । रावणा मरो नको वृथा । जाई आतां स्वस्छाना ॥१७॥ सारावया प्रातःस्नान । दक्षीण समुद्रीं तीर्थ गहन । तेथें करी अनुष्टान । परम नेमी सुनेमें ॥१८॥ ( उत्तरकांड, अध्याय ५ )

तार वानर वाळीचा मंत्री साचा विवेकिया
ह्मणे, 'वाळी बळी गाढा व्यर्थ भेडा निवर्तसी ॥ १०५ ॥
नमूनिया तया मातु विमानांतु सहानुगी
दक्षिणे सागरापारीं वाळी दूरीं विलोकिला ॥ १०६ ॥
स्नान सारूनिया मौनी जपस्थानीं सुनेमिया
( संक्षेप रामायण )

मुक्तेश्वराच्या शैलीचा प्रत्यय देणारा कांही भाग पुढे देत आहे. मुळांतून सविस्तर वाचण्यानेच त्याची अधिक गोडी कळणार आहे. परंतु एवढयावरूनहि मुक्तेश्वराची वैशिष्ट्यें रसिकांच्या ध्यानांत आल्याखेरीज राहणार नाहीत. रावण आणि बळीचें युद्ध होऊन त्यांत रावणाची फटफजिती झाली. ही हकीगत नारदाने पौलस्तीला सांगितली. तेव्हा कपाळावर हात मारून पौलस्ती म्हणाला, 'ह्मणे नळुके घातल्या सामास । सरळे नोहे स्वान पुंछ । मुर्खा करि-ताही उपदेश । गुण न लगे सर्वथा ॥ ३३ ॥ अंधापुढें दाविलें चित्र । बधिरा कर्णीं राग विचित्र । मदोन्मत्ता बुद्धिमंत्र । सांगणें हेची मुर्खता ॥३४॥' पौलस्तीने पुन्हां रावण व बळीचें

सख्य केलें आणि रावणाला त्याने उपदेश केला. ' ह्मणे शंकरकृपा कामधेनु । अवचट लाधली चुकुनु । सत्वगुणाचे मेळवणु । दाउनी दोहन करावें ॥ ३६ ॥ शंकरवर तो रस उत्तमु । सत्क्रीयेचा पश्य नेमु । भंगु नेदिजे तरीच सुगमु । मोक्ष आरोग्य लाहिजे ॥ ३७ ॥ प्राप्त जालीया चिंतामणी । बैसोनीया नौकायनीं । हातीं झेलुनि सिंधु जीवनीं । पाडुनिया बुडवीला ॥३८॥ तैसे केलिया रावणे । सीक्षेतें दीक्षा नाही घेणें । आमुच्या उपदेशाचीं वचनें । व्यर्थ गेलीं सर्वही ॥ ३९ ॥ आतां तरी धरूनी लाज । विवेक विचारें करी काज । ऐसें सांगोनी तपस्वीराज । जाता जाला स्वस्छाना ॥ ४० ॥'

### तत्कालीन परिस्थिति

एकनाथाप्रमाणेच मुक्तेश्वरांच्या वाङ्मयांतहि तत्कालीन समाजजीवनाचें प्रतिबिंब आढळतें. मुसलमानांचें वाढतें आक्रमण व अत्याचार यांनी सारी जनता त्रस्त झाली होती. माळी, सुमाळी व जांबवंत यांनीं ब्रह्मदेव व शंकर यांजकडून वर मिळविले व आतां आपणास कोणी अडवणार नाही असें पाहून यांनी अत्याचारांस सुरवात केली. देवांना सुद्धा जिंकून ' भृत्य कामा योजिले. ' त्यांच्या अत्याचारांचे मुक्तेश्वरकृत वर्णन किती बोलकें आहे पाहा: —

अनर्घ्यरत्न पद्मीणी स्त्रिया । हिरोनी आणीत भोगावया । जेथे जे दिसती तया । हिरोनी घेती सामर्थ्यें ॥ ७३ ॥ मारूनि गाइ ब्राह्मणातें । स्वेच्छा शेविती मांसातें । अखंड करूनी मद्यपानातें । परस्त्रिया भोगीती ॥ ७४ ॥ पुरुष देखोनि सुंदर । त्यावरी करीती बळात्कार । पृष्टी मैथुन आचरती दुरात्मे ॥ ७५ ॥ भंगुनि हरिहर स्थळांतें । ऋषी पळविले समुद्रापरते । मोडोनी सांडीली सर्व तीर्थें । कुत्सिताचारें करूनीया ॥ ७६ ॥

द्वीपखंडें, समुद्र सर्व ओस पडले. अगम अभिचार हाच थोर मार्ग आहे, असें ते म्हणत. त्या वेळच्या परिस्थितींचें वर्णन :

धेनु कळपावरी व्याघ्र कळप । मुसक दळावरी उटीले सर्प । अजा अविकावरी अमुप । चौताळती लांडगे ॥ ७९ ॥ देखोनी हरिणाचीया थाटी । चीते धांवोनि झोंबती कंटीं । चरता पक्षीयांची दाटी । त्यावरी शेन पडियले ॥ ८० ॥ मार्गमारक तस्कराहातीं । वोसरोन सह-संपत्ती । धनीक सांपडे तेव्हां गती । उरती कवण तयातें ॥ ८१ ॥ मातले कामिकांचें कटक । त्यातें अभुक्त स्त्रियांचें शतक । सांपडे तेव्हां त्या रक्षक । ईश्वर तोहि हो न सके ॥ ८२ ॥ खाटीक ग्रामाच्या टांइ । चुकोन प्रवेशल्या गाइ । त्यांतें जगणोपाय काइ । इश्वर ह्मणे मी नेणे ॥ ८३ ॥ तेवी राक्षसीं महादुष्टीं । विश्व पीडितां जाले कष्टी । ह्मणती इश्वर आसतां सृष्टी । कोठें तन्हीं उमगता ॥ ८४ ॥ कोणी नाही निवारिता । कोणी नाही संरक्षीता । विश्व पावोनी आकांता । दीर्घस्वरें प्रळापे ॥ ८५ ॥ ( अध्याय दुसरा )

रामाला त्याचें अवतारकार्य संपल्याची जाणीव देण्याकरिता काळ आला. तो कसा होता ? 'पिंग स्मश्रु कृष्णवर्ण । मुक्त केश आरक्त नयन । तिळक रहीत भाळ शुन्य । राजद्वारा पातला ॥ १७·४३ ॥' परकीय आक्रमकांचें तर हें चित्र नव्हे ? आणि रामाचा अवतार कशासाठीं होता ? ' समुळीं मारिला दशानन । पुढे तुच हळधर कृष्ण । बौद्ध कलंकी हें अभीधान । म्लेंच्छनाशाकारणे ॥ ६३ ॥ '

### युद्धवर्णनांत रोग व औषधि

मुक्तेश्वराच्या या उत्तरकांडाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे वैद्यकशास्त्राचें त्याचें ज्ञान दाखविणारा यम आणि रावण यांच्या युद्धवर्णनाचा भाग. वैद्यकीय ज्ञान मुक्तेश्वराने प्राप्त केल्याचें

यावरून उघड होतें. उत्तरकांडाच्या शेवटीं सुद्धा अशाच प्रकारचें वैद्यकीय रूपक त्याने केलें आहे. ' दक्षी'(ण) कुक्षी समुद्रोदरीं । व्रण उदेला त्रिकुटागिरी । तो छिद्रनी शस्त्रधारी । शस्त्रवैद्य राघवें ॥ १९८ ॥ शैल्य काढुनी रावण । औषधी पींड बिभीषण । भरून केलें पटबंधन । कोटि कल्पें सुटेना ॥ १९९ ॥ निरोगी करून ब्रह्मगोळ । आरोग्य केला लोक सकळ । नाम मात्रा यक वेळ । जीव्हे अलुमाळ स्पर्शतां ॥ २०० ॥ ' [ अध्याय १८ ]. या ठिकाणची शस्त्रक्रिया व मलमपट्टीचा उल्लेख चिंत्य आहे. यम आणि रावण यांच्या युद्धांत रोगांचा मारा यमाने रावणावर केला आणि रावणाने त्या रोगांवर औषधांचा मारा केला. हें वर्णन वाचनीय व वैद्यकशास्त्राच्या अभ्यासूंना अभ्यसनीय आहे, म्हणून तें पुढे देत आहें :

ऐकोनीया रावणागमन । शमन जाला अतिदुर्मन । पाचारूनी कृतांत गण । सिध केले संग्रामा ॥ ४४ ॥ मुर्तीमंत रोग व्याधी । त्यांतें ह्मणे संघटा आधीं । पाटी यमदुतयुत्थीं । त्रासीतील शत्रुतें ॥ ४५ ॥ वात पीत श्लेष्म तिग । क्षय खोकला पांडुरोग । हें मृत्याचें अंतरंग । क्षीण करीती प्राणीया ॥ ४६ ॥ सप्त ज्वर बारा कुष्ट । अर्धचत्वारी परम दुष्ट । शुळ रोगी वधउन पोट । देती कष्ट जीवा तें ॥ ४७ ॥ हागवण पोटवण बहुत । पिसाट माजले सन्निपात । कृच्छ्र विशुचिका कुश्चीत । यम आज्ञेने चालीले ॥ ४८ ॥ उटली फिरंगीयांचीं कटकें । आधिं झडपुनी नेति नाकें । लिंग वृषण मग हस्तकें । घड तोडुनी टाकिती ॥ ४९ ॥ जरा कर्कशा । विशाळ । ह्मणे रोग तितुके माझें बळ । क्षीण करूनी इंद्रिय बळ । मार्ग दावी मृत्यातें ॥५०॥ अंधत्व मुकत्व बहिरत्व देख । देवी गोवर वरण स्फोटक । असो रोग हे अनेक । येक येक धातले ॥ ५१ ॥

या रोगांत ' फिरंगीयांचीं कटकें ' ही सुद्धां मुक्तेश्वराने एक रोगराईच मानली आहे. आता रावणाची या रोगांवरील औषधयोजना पाहा:— रावण आंगें धन्वंतरी । अस्त्रीनी देवांतें हाकारी । चंद्रासी ह्मणे औषधी भारी । सोडुनी मारी दुष्टातें ॥ ५२ ॥ भिल्लातकी हिंगुणी हिरडी । अवाळे सल्लकी निंब निर्गुडी । याचे काष्टे झोडाझोडी । करिता बापुडी निमातिल ॥ ५३ ॥ रस तैल घृत चुर्ण । काढे बुटिले गाढपणें । ह्मणती ताडुनिया चरणें । रानभरीया करूं ॥ ५४ ॥ प्रताप लंकेश्वर मात्रे । शिव पंचाक्षरीच्या मंत्रें । अभीमंत्रुनी गात्रगात्रें । खंड विखंड पाडीलीं ॥ ५५ ॥

उत्तरकांडांतील मुक्तेश्वराच्या भाषेवर एकनाथांचा प्रभाव जास्त दिसतो. याचें कारण हें त्याचें सुरवातीचें ओवीबद्ध काव्य आहे. एकनाथांचा सहवास व त्यांच्या वाङ्मयाचें अध्ययन यांचा संस्कार त्याच्या मनावर ताजा असणें साहजिक आहे; आणि म्हणूनच कित्येक शब्दप्रयोग व दृष्टान्त सारखे असे दृष्टीस पडतात. मात्र या दोघांत एक महत्त्वाचा फरक आहे. एकनाथांनी ऊर्दू शब्दांचा उपयोग आपल्या काव्यांत विपुलतेने केला, तर मुक्तेश्वराने ते शब्द कटाक्षाने टाळून संस्कृत व देशिक शब्दांचा उपयोग केला आहे. म्लेंच्छांची राजवट व त्यांच्याकडून होणारें वेदाध्ययन याचा मुक्तेश्वराला अत्यंत तिटकारा होता. अकराव्या अध्यायांत तो आपल्या वेळच्या परिस्थितीचें वर्णन करतांना म्हणतो, ' ब्राह्मणाची तपश्चर्या । हीन वर्ण आचरे राया । ते ब्राह्मण श्रोत्रियाची ज्याया । म्लेंच्छभोगी ज्यापरी ॥ २० ॥ ब्राह्मण पढे म्लेंच्छशास्त्र । म्लेंच्छ म्हणतो वेदमंत्र । तयापरते अपवित्र । आन नाही भूतळीं ॥ २१ ॥ म्लेंच्छ करी गायत्री पठण । यवन मंत्र जपे ब्राह्मण । पवीत्र राजे त्याचें हनन । तत्काळीक करावे ॥ २२ ॥

उत्तरकांड ही मुक्तेश्वराची संक्षेप रामायणानंतरची व महाभारतापूर्वीची रचना आहे. महाभारतांतील शैली मुक्त, प्रौढ व अधिक सिद्धहस्त वाटते. पण भावेचा जोरदारपणा या उत्तरकांडांत निश्चितच आहे. विविधप्रसंगवर्णनें, युद्धवर्णनें व तत्कालीन समाजस्थितीवरील टीका यांची विपुलता या उत्तरकांडांत आहे. स्वतःची अनिवार प्रतिभा मुक्तेश्वराने या ठिकाणीं कसास लावली आहे. ही कृति लिहून झाल्यानंतर कल्पनाविलासास विस्तृत व योग्य क्षेत्र म्हणून त्याने महाभारतरचनेला सुरवात केली असली पाहिजे. मुक्तेश्वराचा पुरोगामी दृष्टिकोन व त्याचीं इतर वैशिष्ट्यें हा निराळ्या लेखाचा विषय आहे. स्थलसंकोचास्तव या नव्या अप्रसिद्ध ग्रंथाचा अल्पपरिचय इथें दिला आहे.





अनुक्रमणिका

# साहित्य-समीक्षा

## राजविद्या

पुणें येथील स. प. महाविद्यालयामधले मराठीचे प्रधान प्राध्यापक डॉ. सहस्त्रबुद्धे यांच्या दहा स्फुट लेखांचा हा दुसरा संग्रह आहे. हे लेख प्रथम ' वसंत,' ' हंस,' ' किर्लोस्कर ' या मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले आहेत; व आता ते या संग्रहांत पुनर्मुद्रित होत आहेत. ' ऐश्वर्यप्राप्तीची राजविद्या ' असा पहिलाच लेख यांत आहे. त्यांतलें ' राजविद्या ' हें नांव त्यांनी सबंध लेख संग्रहालाच दिलें आहे. मात्र ' राजविद्या ' शब्दाने सूचित होणारा परमार्थ हा या लेखांचा प्रतिपाद्य विषय नाही. याउलट ऐहिक उत्कर्षाच्या किंवा अभ्युदयाच्या ध्येय-प्राप्तीची मीमांसा यांत केली आहे; व ती ऐतिहासिक, सामाजिक, शैक्षणिक, राजकीय आणि वाङ्मयीन स्वरूपाची आहे.

पहिल्यापासून वैयक्तिक पुण्यशीलतेवरच आपला भर असून संघटित ( राष्ट्रीय ) जीवनाची विद्या आपण दुर्लक्षिलेली आहे. त्यामुळे आपल्यास ऐश्वर्य प्राप्त झालें नाही व हा दोष आपण काढला नाही तर पुढेहि तें होणार नाही हा विचार आपल्या राष्ट्रीय जीवनाचा ऐतिहासिक आढावा घेऊन डॉक्टरांनी पहिल्या निबंधांत मांडला आहे. प्रस्थापित सत्ता मदान्ध व जुलमी होऊं लागली की तिला लोकसामर्थ्याच्या आधारें आव्हान द्यावयाचें आणि त्यांतून निर्माण होणारी शक्ति भारताच्या चरणीं अर्पावयाची असें मराठ्यांच्या अस्मितेचें स्वरूप " आम्हा मराठ्यांची अस्मिता ' या दुसऱ्या लेखांत विवेचिलें आहे. हें विवेचनहि आपल्या सर्वांगीण जीवनाच्या जुन्या-नव्या इतिहासावर आधारलेलें आहे. ' कोसी नदी ' हा हल्लीच्या विद्यार्थ्यांच्या संयमहीन जीवनाची कारणमीमांसा करणारा तिसरा लेख आहे. 'दुसरें आव्हान' यांत भारतांतील औद्योगीकरणाचें तौलनिक विवेचन आहे. 'जीवनांतील करार' व 'संघटित जीवनाचा महामंत्र ' हे दोन लेख, पहिल्या लेखाप्रमाणेच, राष्ट्रीय जीवनाच्या निकोपपणाची चर्चा करणारे आहेत.

' मध्यमवर्गापुढील समस्ये'त मध्यमवर्गाच्या उपयुक्ततेची चर्चा परमतखंडनपूर्वक केली आहे. ' काव्याच्या पायावर शास्त्र ' यांत दृष्टान्तानेच मुद्दा सिद्ध करण्याची तर्कदुष्ट पद्धत विवेचिली आहे. ' साहित्यांतील आत्माविष्कार ' आणि ' शेक्स्पिअर–जीवनाचा भाष्यकार ' हे शेवटचे दोन लेख निव्वळ वाङ्मयात्मक आहेत. साहित्यिकाचा त्याच्या साहित्यांत आत्माविष्कार होतो हें रूढ मत संदिग्ध व विवाद्य असून तें एक प्रधान वाङ्मयमूल्य होऊं शकत नाही हें मत पहिल्या लेखांत मांडलें आहे; व दुसऱ्या लेखांत शेक्स्पिअर हा थोर नाटककार व महाकवि असला तरी त्याला संपूर्ण मानवी जीवनाचा भाष्यकार यथार्थतेने म्हणतां येणार नाही अशी विचारसरणी प्रमाणपुरस्सर प्रकट केली आहे.

महाराष्ट्रांतील विश्वविद्यालयीन प्राध्यापकांचा तत्त्वचिंतक ( Thinker ) प्राध्यापक म्हणून एक वर्ग आहे, त्यांत डॉ. सहस्त्रबुद्धे यांची गणना करावी लागेल. केवळ अध्यापनीय

राजविद्या–[ लेखक–डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे; प्रकाशक– अ. अं. कुलकर्णी, कॉंटिनेंटल् प्रकाशन, टिळकरस्ता, पुणें २; किंमत साडेतीन रुपये. पृष्ठें १८३ क्राउन आकाराचीं ].

अनुक्रमणिका

विषयापुरतेंच आपलें चिंतनमनन मर्यादित न ठेवतां समाजाच्या इतरहि अंगांचें व्यापक चिंतनमनन व्यासंगपूर्वक आणि तळमळीने करणाऱ्या प्राध्यापकांना मीं तत्त्वचिंतक म्हटलें आहे.डॉ.सहस्रबुद्धे मराठी वाङ्मयाचें अध्यापन करीत असले तरी त्यांनी समाजजीवनाचीं इतर अंगेंहि आपल्या सखोल अभ्यासाचे विषय बनविलीं आहेत हें त्यांच्या 'भारतीय लोकसत्ता', ' विज्ञानप्रणीत समाजरचना ', ' माझें चिंतन ' इत्यादि ग्रंथांवरून स्पष्टच दिसेल. सदर लेख-संग्रहहि त्याला दुजोराच देणारा आहे.

कोणत्याहि विषयावरचीं आपलीं मतें डॉ.सहस्रबुद्धे तळमळीने आणि हिरीरीने मांडतात. तीं त्यांचीं मतें तंतोतंत सर्वांनाच पटतील असें नाही; आणि ते स्वतःहि अशी अपेक्षा बाळगीत नाहीत. उदाहरणार्थ, शेक्स्पिअरबद्दलच्या या लेखसंग्रहांत मांडलेल्या आपल्या मतांबद्दल ते प्रांजलपणें म्हणतात की ' हीं मतें फारशीं कोणाला मान्य होतील अशी मला आशा नाही. ' परंतु डॉ. सहस्रबुद्धे यांच्या मतप्रतिपादनांतील त्यांचा प्रामाणिकपणा ( Sincerity ) व प्रतिपाद्य विषयाचा प्रगाढ व्यासंग या दोन गुणांबद्दल त्यांच्या प्रतिपक्षीयांनासुद्धा त्यांच्यापुढे आदराने मान लववावी लागेल ही गोष्ट येथे नमूद करणें आवश्यक आहे.

सावध नी रेखीव विचारसरणी, प्रमाणांची प्रचुरता, निर्भयपणा, तळमळ आणि गाढ व चौफेर व्यासंग यांसाठी या लेखसंग्रहांतील दहांपैकी निदान सात लेख तरी अभ्यासकांनी जरूर मनन करावे. आपल्या निबंधांच्या लेखनांत लालित्य आणून वाचकांचा अनुनय सहस्र-बुद्धे करीत नाहीत, कोणाची भीडमुर्वत बाळगीत नाहीत की विशिष्ट मतें मांडतांना आपण एकाकी आहोंत याची पर्वा करीत नाहीत. ही वैचारिक रग त्यांना त्यांच्या प्रामाणिक-पणामुळे व जबर व्यासंगामुळे आलेली असून ती मराठी निबंध-लेखनांत दुर्मीळ आहे.

या लेखसंग्रहांतील एकच प्रातिनिधिक लेख या दृष्टीने मी 'आम्हा मराठ्यांची अस्मिता' या लेखाकडे अंगुलिनिर्देश करीन;आणि त्यांतहि 'मराठ्यांनी काय बांधलें?' या कांहींच्या कुत्सित प्रश्नाला सहस्रबुध्यांनी दिलेलें ' मराठ्यांनी हिंदुस्तान बांधला ' हें चपखल उत्तर वाचकांच्या नजरेस आणीन (पृ. ३७). 'मध्यमवर्गापुढील समस्या' हा लेखहि प्रबल परमताचें युक्तियुक्त-खण्डन करणारा उत्तम लेख म्हणून निर्देश करण्यासारखा आहे.

सदर निबंधांची भाषा रेखीव, सुटसुटीत, साधी पण शास्त्रीय विवेचनाला अनुकूल, ठाशीव, प्रसंगविशेषीं उपहासगर्भ, आत्मप्रत्ययसंपन्न आणि प्रसन्न आहे. 'माझें चिंतन' व 'राजविद्या' हे दोन निबंध-संग्रह प्रकाशित करून डॉ. सहस्रबुद्धे यांनी वाङ्मयाच्या प्राध्यापकांवर नेहमी येणारे एकांगीपणा, जागरूकतेचा अभाव,मागासलेपणा इत्यादि आक्षेप खंडित केले आहेत असें म्हणा-वेंसें वाटतें. हें असलें विचारप्रवर्तक व भरीव वाङ्मय मराठा वाचकांना उपलब्ध करून दिल्या-बद्दल लेखक व प्रकाशक यांना धन्यवाद दिले पाहिजेत. ● ● ●

के. ना. वाटवे

## संस्कृतप्रतिभा

भारत सरकारच्या साहित्य अकादमीतर्फे प्रसिद्ध झालेल्या या संस्कृत षाण्मासिकाचा पहिला अंक अभिप्रायार्थ आला आहे. संस्कृत पुस्तकांच्या नेहमीच्या आकारांत स्वच्छ व

**संस्कृतप्रतिभा**— [ एप्रिल १९५९, साहित्य अकादमी, नवी दिल्ली; पृष्ठें १२२, वार्षिक वर्गणी रु. ४. प्रत्येक अंकाची किंमत रु. २. संपादक : डॉ. व्ही. राघवन्, प्रेसिडेन्सी कॉलेज, मद्रास युनिव्हर्सिटी. ]

सुरेख छपाईमुळे हें नियतकालिक साधेपणांतहि आकर्षक दिसतें. पहिलाच अंक असल्यामुळे राष्ट्रपति, उपराष्ट्रपति, पंतप्रधान यांचे आशीर्वाद मिळाले आहेत. पंतप्रधानांच्या एका लिखाणांतील उतारा संस्कृतचें माहात्म्य वर्णन करणारा असा अनुवाद करून उद्धृत केला आहे. पहिल्याच अंकांत १५ स्वतंत्र संस्कृत कविता आहेत. त्यांत श्री. चिन्तामणराव देशमुखांची 'रवीन्द्रवन्दनं' ही कविता आहे. त्याचप्रमाणे श्री. वर्णेकर यांची 'सुरभारती–जयगीतम्' ही कविता आहे. साधारणपणे सर्वच कवितांवर संस्कृतमधील ठराविक तोंडवळ्याचा छाप आहे; तरीहि जोधपूरचे जगदीशचन्द्र यांची जयदेवाच्या गीतगोविंदाचें अनुकरण करणारी 'प्रियदर्शनोत्सुका' ही कविता उल्लेखनीय आहे. संपादक डॉ० राघवन् यांनी 'टॉलस्टॉय् आणि हिरवी काठी' या शीर्षकाखाली लिहिलेली तीन श्लोकांची कविता चाकोरीबाहेरील विषय हाताळते. हें कवितावाङ्मय एकंदर २८ पानें आहे. त्यानंतरचा गद्यविभाग ५८ पानें आहे. तो मात्र नावीन्यपूर्ण आहे. पहिली कथा सांप्रदायिक असली तरी त्यापुढील नेमाड प्रांतीची लोककथा चांगली आहे. त्यानंतर बौद्ध वाङ्मय संस्कृतमध्ये कसें लुप्त झालें व इतरत्र तें अजून कसें उपलब्ध आहे हें सांगणारा लेख आहे. बौद्ध वाङ्मयाच्या अभ्यासकांना तो उपयुक्त असला तरी विषयाच्या मानाने अगदीच त्रोटक आहे. आजच्या मराठी मासिकांतील एक पान भरेल. त्यापुढे 'कैलासनाथविजय' ही एक-अंकी नाटिका (व्यायोग) रावणाच्या आयुष्यांतील प्रसंगावर लिहिलेली आहे. जिथे संस्कृत नाट्याची हौस असेल अशा शाळांमधून सहज करतां येण्याजोगी ही नाटिका आहे. त्याच्यापुढे 'यौवराज्यम्' ही एकाङ्किका आहे. रामाच्या व लक्ष्मणाच्या वनवासाला जाण्याच्या निश्चयामुळे भरताला यौवराज्य मिळतें हा विषय आहे. परंतु या भागांत विशेष उठून दिसणारें लिखाण म्हणजे नवी दिल्ली येथील श्री. रत्नपारखी यांनी लिहिलेलें 'जयदेवपद्मावतीयं' हें प्रहसन. जयदेवाला आधुनिक काळांत आणण्याची कल्पना अजब. पण तीं रंगवितांना संस्कृत भाषेला आधुनिक वस्तूंच्या वर्णनाकरिता राबविण्याचा प्रयत्न उल्लेखनीय व अनुकरणीय आहे. शक्यतों हें प्रहसन मुळांतच वाचावें.

नंतर कवितांचा दुसरा हप्ता सुरू होतो तो वीस पानें. कदाचित् एकाच वेळीं सर्व कविता छापल्या तर वाचक कंटाळतील म्हणून मध्ये गद्य घालून ही विभागणी केली असावी. पहिली एका जातककथेचें भाषांतर आहे. तसेंच गीतांजलींतील तीन काव्यांचा अनुवादहि आहे. एका द्राविड कवीच्या तामीळ भाषेंतील मूळ काव्याचाहि एक अनुवाद आहे. तेलगू भाषेंतील काव्याचाहि एक अनुवाद आहे. हा अनुवादात्मक काव्यभाग एवढ्याकरिताहि स्वतंत्र छापला असावा.

एकंदर नऊ पुस्तकांवर अभिप्राय आहेत. मराठी वाचकांच्या दृष्टीने त्यांत निर्देश्य म्हणजे राजकवि यशवंत यांच्या 'जयमङ्गला' या खंडकाव्याच्या संस्कृत अनुवादावरहि अभिप्राय आहे. ● ● ●

श्री. भि. वेलणकर

विकसन पूर्ण झालें नव्हतें. या काळांतील बऱ्याच लेखकांच्या कथालेखनावर अशा संक्रमण अवस्थेचा परिणाम झालेला दिसतो. कुळकर्ण्यांच्या या पहिल्याच कथासंग्रहावर ह्या झुलत्या वाङ्मयीन लेखनपद्धतीचा परिणाम झालेला दिसतो. याचें कारणहि हेंच असावें. नवकथेचा त्यांना लाभलेला सहवास यांतून ठिकठिकाणीं जाणवतो. अशा वेळीं त्यांच्या कथेची निर्मिति अनुकृतींतून झाली आहे काय असा प्रश्न उपस्थित होणें अपरिहार्य आहे. वाङ्मयीन अनुकृति ही नेहमीच अनिष्ट असते असें नव्हे. ह्या अनुकृतींतहि लेखकाचीं स्वतंत्र वैशिष्ट्यें अनुस्यूत असतात; आणि या वैशिष्ट्यांच्या वाढीवरच लेखकाचें साहित्यप्रांतांतील अस्तित्व उरत असतें. कुळकर्ण्यांचें प्राथमिक लेखन असें अनुकृतींतून उतरलें असूनहि वाङ्मयीन नव्या जाणिवांची इतकी विपुल आणि समृद्ध पेरणी ते आपल्या कथांतून करतात कीं हा पहिलाच कथासंग्रह त्यांच्याविषयींच्या अपेक्षा वाढवितो.

कुळकर्ण्यांचे कथाविषय मध्यमवर्गीयांचें पोखरलेलें जीवन, गृहीत जीवनसत्याला वास्तवतेने गेलेला तडा, आणि त्यांतून निर्माण झालेलें, उभें जीवनच नष्ट करून टाकणारें भीषण नाट्य हे! यांतील सारीं पात्रें " सर्वजण ज्या जगांत वावरत आहेत, तेथे अशीं कांही चमत्कारिक बंधनें इच्छेविरुद्ध पाळावीं लागतात", या सत्यावर जीवन जगूं पाहतात. या आखीव तत्त्वाच्या गुंतावळींतूनच त्यांच्या जीवनांत दुःखाची निर्मिति झालेली असते; आणि या वावटळींत पात्रांच्या उद्ध्वस्त जीवनाचे विखुरलेले कण कुळकर्णी वेचूं पाहतात. हे कण वेचीत असतांना कुळकर्ण्यांची लेखणी उभारीची कलात्मक जाणीव प्रकट करते. ' भार ' कथेंतील वत्सलाबाई, 'बुलडॉग' कथेंतील विश्वासराव किंवा ' वर्तुळांतील ' भाऊराव यांच्या जीवनाला जे सुरुंग लागतात ते त्यांच्या तत्त्वाला सुरुंग लागलेले असतात म्हणून. गृहीत तत्त्वाचा केंद्रबिंदु आणि त्या केंद्राभोवतीं फिरणारें जीवन हें यांतील पात्रांचें वैशिष्ट्य. केंद्र बदलतांच आपलें जीवनच कोलमडून पडतें आहे अशी भीति यांतील पात्रांच्या मनांतून भरून उरते. जीवनांत परिस्थितीला अनुलक्षून नव्या परिघाचें रेखन अपरिहार्य असतें ही जाणीवच यांतील पात्रांच्या मनांत सतत असते. आपल्या जीवनाची कुठली तरी कडा ढासळते आहे असेंच यांना वाटत असतें; आणि ती ढासळत असतांना उस्कटलेल्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर गतजीवनाची क्षीण रुपेरी रेखा खट्कन उमटून जाते. या पात्रांच्या जीवनाचा डोलाराच अशक्त अशा आधारावर उभारलेला असतो. तो निखळतांच सारें जीवनच उन्मळून पडतें आहे असें यांना वाटतें. मग हीं सारीं पात्रें निर्विकारपणें शून्यांत बघत तासन् तास बसतात. या पात्रांची ही असहायताच कुळकर्णी टिपून घेण्याचा प्रयत्न करतात. पात्रांच्या दिशाहीन दृष्टीला कुळकर्ण्यांची लेखणी शब्दरूप देते. पात्रांच्या पिंजलेल्या जीवनांतून निश्चित असें तत्त्व त्यांची प्रतिभा शोधते. जीवनांतील ही सुसंगति—ही सुजाण समज—प्रकट करणें हेंच खऱ्या कलावंताचें कार्य असतें. ' छाया ' कथेंतील शकुंतलाबाईचें मन आपल्या मुलीच्या ( विनोदच्या ) तारुण्यसुलभ हालचाली पाहून सुखदुःखांनी विणलें जातें. शकुंतलाबाईना जीं स्पंदनें होतात, त्या स्पंदनांना कलारूप देण्यांत कुळकर्ण्यांची प्रतिभा यशस्वी होते. ' स्मृति 'सारख्या वेगळ्या भाववृत्तीच्या कथेंत इतक्या आर्त, तरल आणि कंपित क्षणांना ते चिमटींत धरून ठेवतात कीं, त्या क्षणांची लय पेलणें आपल्याला अशक्य व्हावें. कुळकर्णी यांचें सामर्थ्य प्रकटतें या भावार्ततेला आकार देण्यांत. त्यांच्याकडून मी अपेक्षा करीन त्यांच्या या गुणाच्या वाढीची.

तसें पाहिलें तर काळाची केवढी मोठी मर्यादा यांतील पात्रांना पडली आहे. आकाशांतील ढगासारखी वृद्धत्वाची कळा यांतील पात्रांच्या शरीरावर आणि

मनावर झाकळून आली आहे. शंकुतलाबाई, बाबा अरळकर, 'खुराडें' मधील अण्णा, चंद्रभागाबाई, विश्वासराव इत्यादि पात्रांना झालेलें दुःख ओहोटीनेंच अधिक आहे. हें दुःख एकसुरी होऊन कुलकर्ण्यांच्या कथेभोवती त्यानेच रिंगण रोवणें अशक्य नव्हतें. पण कुलकर्णी या पात्रांच्या जीवनाचे इतके बारीक आणि विविध पदर आवळतात की, त्यांतून स्वतंत्र अशा कथावस्तूंची कमाईच त्यांच्या पदरांत पडते. सनातन विषयाला स्पर्श करूनच कलेला स्थिरता येत नाही. काळाला पुरून उरत नाहीं. ती येण्याकरिता प्रकट झालेलीं मूल्येंच शाश्वत असावीं लागतात. हीं मूल्यें कमीअधिक प्रमाणांत जेथे यशस्वीपणें प्रकट होतात तेथेच जिवंत कलेचा प्रत्यय येऊं लागतो. 'दुःख' ही कांही प्रमाणांत मनुष्यनिर्मित शाश्वत स्वरूपाची देणगी. तिच्या आशीर्वादानेच यांतील पात्रांच्या मनांतून दुःखाच्या भरीव रेखा उमटलेल्या दिसतात. या रेखांतून वास्तवाचें जें रुचेत प्रत्ययत्व येतें तेंच कुलकर्ण्यांचें खरें यश. संवेदनाक्षम अंतःकरणांत भावनांचा सागरच हेलावत असतो. यांतील पात्रांच्या जीवनांत या लाटांचें नृत्य किती तरी मोठ्या प्रमाणांत चाललेलें असतें. दुःख होतें. प्रत्येक व्यक्तीला होतें. परंतु त्याची जाणीव होण्याकरिता संस्कारक्षम मन असावें लागतें. यांतील साऱ्याच पात्रांचें मन संस्कारक्षम, प्रगल्भ आहे. संस्कारशून्य गुलुफच्याहि मनावर त्याच्या विशिष्ट संस्कृतीचे घाव पडत असतात. या प्रगल्भतेमुळेच यांतील दुःख अधिक तीव्र होतें. ही तीव्रताच कुलकर्णी शब्दांत तोलून धरतात.

पात्रांची सजीवता हा कुलकर्ण्यांचा सहज लक्षांत येणारा आणखी एक गुण. बाबींचें अंग हळूहळू भरत असतांना, तिच्या त्या वाढत्या अंगाबरोबर वत्सलाबाईच्या वाढणाऱ्या काळज्यांचा आलेख काढतांना, त्यांच्या अंतर्विश्वांत होणाऱ्या नाजूक स्पंदनांना शब्दरूप देतांना किंवा 'स्मृति' सारख्या काव्यात्मक कथेंत भूतकाळांतील आठवणींतून वर्तमानांत आपल्या प्रेयसीची प्रतिमा रेखाटतांना त्यांची शब्दगंगा त्या पात्रांनाच आपल्यापुढे उभें करते. या ठिकाणीं आशयावरची पक्की पकड, मनांत रुजून वर आलेला विषय सहज शब्दांतून बाहेर पडतो. अभिव्यक्तीबरोबरच आशय रिचतो.

अभिव्यक्तीवर अशी जाणीवपूर्वक पकड असूनहि कधी कधी मात्र त्यांची लेखणी उगीच इकडेतिकडे भटकते. 'चक्र' सारख्या वैशिष्ट्यहीन कथेंत – चांगला विषय हातीं लागलेला असतांना सुद्धां – आकृतीच्या पसाऱ्यांत तो आकारत नाही. निवेदनशैलींतील ही ढिलाई मूळ आशयाच्या केंद्रापासून तुटते. झाडाच्या झुबक्यांतून गरगरणाऱ्या पिवळ्या पानासारखा आशय आपटी खातो. बाबा अरळकराचें दुःख पिळत असतांना मध्येच दिनूचें प्रेमप्रकरणहि रसिकतेने रंगविलें जातें. येथे कथेचा गाभा फिरत्या चक्रावर पाण्याचे थेंब टाकावे त्याप्रमाणे वेगळा फेकला जातो. 'खुराडें' कथेचा हाच प्रकार. वकीलवाडींतील सारींच पात्रें या कथेंत येतात. तीं यायला तशी हरकत नव्हती. परंतु वातावरणाची निर्मिति करण्यापलीकडे कांही न करतां निघून जातात. त्यामुळे कथेंतील कथाबीज भुईवर रेंगाळतांना दिसतें. वकीलवाडींतील पात्रांच्या दुःखाकडे बोट दाखवून कुलकर्णी मागे फिरतात. सूचनांचा उपयोग करून कथा संपल्यानंतर अर्थाच्या छटांनी अनंतांत उडी घेतली पाहिजे. परंतु तोहि प्रकार येथे होत नाही. कथा जशी त्यामुळे सरपटते, तसें त्यांतील दुःखहि मनाला खोलवर असा व्रण करीत नाही. याला कारण या पात्रांच्या बाह्य क्रियांतूनच त्यांच्या दुःखाचा मागोवा ते घेतात. अंतर्विश्वाचें प्रकटन बाह्य हालचालींतून होतें हें खरें; परंतु कलावंताच्या सहानुभूतीच्या ओलाव्यांत तळांतील बीजाला अंकुर फुटला पाहिजे. या क्रियांच्या मागें दुःखाचा जो अज्ञात

सागर आहे तोच ढवळून निघाला पाहिजे. त्यांत निर्माण झालेल्या लाटा-लहरींनी सूक्ष्म अशीं आंदोलनें तितक्याच तीव्रतेने शब्दांतून जाणवलीं पाहिजेत. त्यांच्या भाषेंतील अलंकार-गद्य हा एक त्यांच्या मार्गातील अडथळा. कथांचा आरंभ वा शेवट अशा नीरस प्रतिमांच्या ओढगस्तींतून होतांना दिसतो. अर्थात्, ही प्राथमिक तथा प्रायोगिक अवस्था लक्षांत घेतां त्यांच्या गुणांचाच पर्वत उभा राहतो. ● ● ●

गजमल माळी

## सेवा

कृत्रिम गुंतागुंतीचें कथानक आणि अनेक वैशिष्ट्यहीन व्यक्ति यांच्या खुंट्यांवर कशाबशा अडकविलेल्या विविध विषयांवरील चर्चा नि कांही उपरोधपूर्ण संवाद, असें स्थूलमानाने या नाटकाचें स्वरूप आहे. आपल्या भोवतालच्या सामाजिक नि राजकीय जीवनांतील विविध दोषांवर प्रकाशझोत (!) टाकण्याचा हव्यास लेखकाच्या मनांत इतका बळावलेला आहे की, त्यामुळे कित्येक उपरे प्रसंग नि कंटाळवाणे संवाद यांची आपण गर्दी करीत आहोंत याकडे त्याचें संपूर्ण दुर्लक्ष झालेलें आहे. प्रस्तुत नाटकांतील पहिलाच प्रवेश,संस्कृत नाटकांतील विष्कंभकासारखा वाटतो नि त्याचा विस्तार मात्र जवळपास अंकाएवढा झालेला आहे.या पहिल्या प्रवेशांत,विश्वास नि भगवन्त हे विधानसभेंत नव्याने निवडून आलेले दोघे स्नेही,पुण्यांतील एका रस्त्याच्या कडेने प्रस्तुत नाटकांत योजिल्या जाणाऱ्या रहस्याची प्रेक्षकांच्या सोयीसाठी खुल्या दिलाने चर्चा करतात. त्यांनी प्रेक्षकांना सर्व माहिती दिल्यानंतर, योगायोगाने (!) चंदू आपल्या सायकलची विश्वासला धडक मारतो. हा चंदू–पुणेंकरांविषयीच्या कांही कोल्या योजनेनुसार पाठ म्हणून दाखविल्यानंतर– आपली स्वतःची, आपलें पुत्रवत् पालन करणाऱ्या तात्यासाहेबांची व आपण भावी मंत्री आहोंत हें न सांगतां जिची परीक्षा करण्यासाठी विश्वासराव निघाले होते, त्या तात्यांच्या मुलीची, 'सेवा'ची भरपूर माहिती देण्याचें काम आटोपून, विश्वासला आपल्या घरीं घेऊन येतो. इथे पहिला प्रवेश संपून नाटकाला आरंभ होईल असें वाटूं लागतें.

संपूर्ण नाटकाची रचना, अशा रीतीने पूर्वनियोजित कारागिरींतील अस्वाभाविकता तीव्रतेने जाणविणारी आहे नि म्हणून नाटकाचें कथानक गतिहीन, उत्कंठाशून्य व नीरस वाटतें.

नाटकाचें दुसरें महत्त्वाचें अंग म्हणजे स्वभावरेखन त्याचा तर येथे पत्ताच नाही.माणसें नुसतीं बोलतात; परंतु बहुधा त्यांचें बोलणें त्यांच्याहि अंतरंगांतून निघालेलें नसतें, नि म्हणून प्रेक्षकांच्या केवळ कानांवरच तें स्थिरवल्यासारखें वाटतें. नाटकांतील घटना आणि कथानकांतील व्यक्तींच्या कृति व विचार यांचा कांही अपरिहार्य असा अन्योन्यसंबंध असतो याची जाणीवच कुठे यांत आढळत नाही. यांतील व्यक्ति जें बोलतात तें विशिष्ट प्रसंगींची त्यांची प्रतिक्रिया म्हणून नव्हे, तर त्यांचा 'बोलविता धनी' जो नाटककार त्याला त्यांचे ते शब्द, विचार नि विषय प्रिय वाटतात म्हणूनच. स्वाभाविकच, स्वभावपरिवर्तन हा यांतील परवलीचा शब्द आहे. नागपूरचे भैय्यासाहेब 'सेवा'ला बघण्यासाठी येणार असतात–( विश्वास म्हणजेच भय्यासाहेब हें फक्त प्रेक्षकांना माहीत असतं ) परंतु विश्वास घरीं येतांच,'सेवा' त्याचीच निवड

सेवा–( नाटक ) [ लेखक : प्र. श्री. कोल्हटकर; प्रकाशक : मॉडर्न बुकडेपो, पुणें २; किंमत १ रु. ५० न. पै. ]

करणार असें चंदू नि तात्यासाहेब बोलूं लागतात. भय्यासाहेबांची बॅग चोरल्याचा विश्वासवर आळ येतो तेव्हा पोलिसांत वर्दी देऊनहि तात्यासाहेब निर्विकारपणें त्याला आपला जावई म्हणून गृहीत धरीत असतातच ! कंटाळवाण्या संवादांना कंटाळणाऱ्यांना थोडासा दिलासा मिळतो तो, दादा आणि काकी ही तथाकथित सार्वजनिक कार्यकर्त्यांची जोडी आली असतां चंदूच्या औपरोधिक विधानांचा पट्टा सुरू होतो तेव्हां.याच संवादांत,दादा व काकी या माता-पित्यांना आपल्या मुलीने, भावी मंत्र्याऐवजी चन्दूला पति म्हणून निश्चित केल्याचें कळतें नि लागलीच, तात्यासाहेबांना ते पदरांत घेण्याची भाषा बोलूं लागतात. दारिद्र्याने ( ! )पीडित झाल्याने हातभट्टीच्या दारूची सवय जडलेले ' पंत ' दुसऱ्या अंकांत चंदू दारू सोडण्यास सांगतो तेव्हा आनंदाने त्या गोष्टीस तयार होतात. भिकाऱ्याच्या वेषांतील ' धर्मा ' बंडगार्डन-मध्ये विश्वासवर लाटीचा आघात करून त्याला जखमी करतो ( त्यामुळे ' सेवा 'वर असलेलें आपलें प्रेम प्रकट करण्याची त्याला संधि मिळते ! ) आणि दुसऱ्याच दिवशीं घरीं येऊन त्याची माफी मागूनहि मोकळा होतो. एकूण काय तर कुठल्याहि व्यक्तीला पीळ असा नाहीच! सारा अगदी लिबलिबीत कारभार ! साहाजिकच कोणत्याहि प्रसंगांतील नाट्यमय संघर्ष एकतर स्वतः लेखकाला जाणवलेला तरी नसावा किंवा जाणवूनहि व्यक्त करणें त्याला जमलें नसावें. राहतां राहिलीं कांही खुसखुशीत वाक्यें.

पंतः– घाईघाईने निकालांत काढून त्याचा विचका करायला, तुझें लग्न म्हणजे कांही एखादा राजकीय प्रश्न थोडाच आहे ?

चन्दूः– खरंच आहे जिजी. वेड लागल्याशिवाय का आपला हा माडीवरचा मिनिस्टर असा शहाण्यासारखं बोलेल?

सीमाः—एखादं प्रकरण जगजाहीर झाल्याशिवाय तें ' टॉपसीक्रेट ' कसं होईल ?

हीं नि यांसारखीं आणखी बरींच वैशिष्ट्यपूर्ण वाक्यें निवडणें सहज शक्य आहे; परंतु केवळ या वाक्यांसाठी इतर सारा पसारा सहन करण्याची प्रेक्षकांवर पाळी यावी हें कांही बरें वाटत नाही. तसेंच विनोदासाठी म्हणून चन्दूच्या तोंडीं "तिच्या आरक्त कपोलांवरून तुमच्या घरचा सीमाप्रश्न सुटला आहे " असें वाक्य, तात्यासाहेब, दादा नि काकी यांच्यासमोर बोलत असतांना घालणें किंवा " पुरुषाला ' जोड्याने ' फिरण्याची सवय झाली म्हणजे अनवाणी चालणें जमत नाही " असें दुसऱ्या लग्नाचें समर्थन पंतांनी ' सेवा ' समोर करणें अप्रयोजकहि वाटतें. नाटकाच्या प्रारंभीं नाटककाराने एक टीप दिली आहे ती अशी–

" मुंबई सरकारच्या मेळे, तमाशे व रास यांच्या पूर्वपरीक्षण मंडळान ' सेवा ' या नाट-काचा प्रयोग मुंबईराज्यांत करण्याची परवानगी दिली आहे. "

**( उणीव आहे ती फक्त प्रयोग करणारांची )** जाड ठसा लेखकाचा. ही टीप स्वतः इतकी बोलकी आहे की तीसंबंधी अधिक काय लिहावें ? ● ● ●

भगवन्त दशमुख

## लाडकी लेक

ग्रामीण जीवनावरील कथा-कादंबऱ्या लिहिणारे श्री. म. भा. भोसले यांच ' लाडकी-लेक' हें तिसरें नाटक. प्रथितयश लेखकाचें नाटक म्हणून साहजिकच कोणाच्याहि अपेक्षा

लाडकी लेक–( नाटक ) [ लेखक : म. भा भोसले; प्रकाशक : ग्रामीण प्रकाशन, धनगांव, जि. सातारा. किंमत २ रु. ]

उंचावल्या जातात. नाटक अगदीच अपेक्षाभंग करणारें आहे असें नसलें तरी उंचावलेल्या अपेक्षा पूर्ण झाल्याचें समाधान मात्र तें निश्चितच देऊं शकत नाही.

भोसल्यांना कथावस्तु चांगली गवसली आहे. आपल्या एकुलत्या एक पोरीवर जिवापाड प्रेम करणारा, गांवचा धनी आबा पाटील; पिळदार शरीराचा नि देखण्या अंगलटीचा पाटलाचा आवडता चाकर संपत नि त्यावर प्रीत करणारी पाटलाची लेक सखू यांतून खरं म्हणजे, उत्कंठापूर्ण नि नाट्यमय प्रसंगांनी नटलेलें कथानक साकार व्हायला हरकत नव्हती. नाट्यगर्भ असे अनेक प्रसंग लेखकाच्या कल्पकतेने हेरलेहि आहेत. एका धनगराच्या बाईला एकाकी बघून तिचा हात धरणाऱ्या जमदाड्याच्या पोराला आबांनी भरचावडीवर चोपलें नि त्या धनगाराची क्षमा मागायला लावलें हा प्रसंग किंवा आबा गांवाला गेले आहेत म्हणून निर्धास्तपणें परस्पर सहवाससुख घेणाऱ्या संपत नि सखूच्या कानीं 'संप्या भडव्या' ही संतत हांक पडते तो प्रसंग; तसेंच आबाच्या धास्तीने अंथरूण धरलेल्या संपतच्या घरीं स्वतः आबा जातात तेव्हाचा प्रसंग, हे असे आहेत की त्यामुळे प्रभावी नाट्य नि उत्कंठा ताणणारा संघर्ष निर्माण व्हावयास हवा होता. परंतु तसें घडलेलें नाही. नाटककाराने नाट्यमय प्रसंग प्रेक्षकांसमोर समूर्त करून विविध पात्रांच्या स्वभावछटांचाहि रंग त्यांत भरण्याऐवजी केवळ निवेदनाच्या माध्यमांतून व मुद्दाम घडविलेल्या संभाषणांतून बहुतेक महत्त्वाचे प्रसंग व्यक्त केल्यामुळे, प्रस्तुत नाटकाचें कथानक कणा नसल्यासारखें व स्वभावदर्शन निष्प्रभ झालें आहे.

जमदाड्याच्या पोराला चोपण्याचा प्रसंग आबाच्या व्यक्तिमत्त्वाचा महत्त्वाचा पैलू स्पष्ट करणारा; परंतु तो रंगभूमीवर घडतच नाही. प्रेक्षकांना तो कळावा म्हणून, आबा नि दादा यांच्या प्रदीर्घ संवादांतून तो आबाच्या तोंडून वदविला आहे. आबा नि दादा यांचा पहिल्या अंकांतील सारा संवाद स्पष्टीकरणात्मक व म्हणून कृत्रिम नि रसापकर्षक वाटतो. नाटकाशीं एकजीव झाल्यासारखा तो मुळीं वाटतच नाही.

पहिल्या अंकाच्या शेवटीं, बघायला आलेल्या पाहुण्यांसमोर, सखू नकार देते तेव्हाचा प्रसंगहि अपेक्षेप्रमाणे मनाची पकड घेत नाही. या प्रसंगीं आबाच्या मनाची, पोरीवरील प्रेम व प्रतिष्ठा यांमध्ये जी घालमेल अपेक्षित वाटते ती सर्व अव्यक्तच राहते. तसेंच अपमानित जयसिंगराव, 'पाहून घेईन' म्हणून निघून जातात तेव्हा एका वेगळ्या संघर्षाचें बीं रुजल्यासारखें वाटतें; परंतु त्याला कुठे अंकुरच फुटूं देण्यांत आलेला नाही.

दुसऱ्या अंकांतील प्रसंग तर अधिकच नाट्यमय आहे. बाहेरगांवीं निघालेले आबा, पावसामुळे परत येतात तों त्यांना संपत नि सखूची सलगी चाललेली दिसते. ते संतापतात. प्रेक्षकांची उत्कंठा कमालीची ताणणारा हा प्रसंग! पण संपत पळून जातो नि सखू खोलीचें दार बंद करून स्वतःला कोंडून घेते नि अंक संपतो. 'चूक आपलीच आहे' असें सखू आंतून सांगतें हें खरें, पण त्याची प्रतिक्रिया आबांना व्यक्त करण्यास अवसरच मिळालेला नाही. त्यांच्या मनांतील संघर्ष नाटकांत कुठे उत्कटतेने प्रकटच होत नाही.

तिसऱ्या अंकांतहि तोच प्रकार! आबांच्या धास्तीने आजारी पडलेला संपतचा बाप आबालाच साहाय्यकर्ता म्हणून बोलावून नेतो. आबा जातात. परंतु प्रत्यक्ष हा प्रसंग देखील रंगभूमीवर घडतच नाही. राधू आणि कोयना या नोकर-मोलकरणींच्या संवादांतून पूर्वार्ध नि परतलेल्या आबांच्या नि दादांच्या संवादांतून उत्तरार्ध प्रेक्षकांना निवेदन केला जातो.

या विशिष्ट रचनेमुळे संपूर्ण नाटक रंगभूमीवर घडत नसून ऐकविलें जात आहे असें सारखें वाटत राहतें. सखू आणि संपत या दोघांच्याहि व्यक्तिरेखा ठसठशीतपणें कुठे प्रतीत होत नाहीत. पांचवीपर्यंत शिकलेली ही ग्रामीण रमणी आपल्या सुखदुःखांच्या भावनांना

सांकेतिक रीतीने गाणीं गाऊन व्यक्त करते (हीं गाणींहि संस्कृत शब्दांनी लखडलेलीं!), वडील घरीं असतांनाहि, न्हाणीघरांत संपतला पाटीला साबण लावायला बोलावण्याचें धैर्य दाखविते, तो न आल्यामुळे रुसते आणि उलट "लाजायला काय झालं? मी काय नागड्यानं न्हात होते?" असा रोखठोक सवालहि संपतला करते. सखूच्या सुसंबद्ध व्यक्तिरेखेला हें कितपत साजून दिसतें तें सांगणें कठीण !

कुस्त्या मारणारा तरणाबांड नि देखणा संपत आबाला वचकून सखूच्या आक्रमक प्रणया-पासून दूर जाऊं बघतो हें समजण्यासारखें असलें तरी तो हतबल होऊन आकर्षणानें तिच्या आधीन होतो की आंतरिक प्रेमाने, याचें स्वरूप नीटसें कुठेंच स्पष्ट होत नाहीं.

बऱ्याच मराठी नाटकांत अधूनमधून लुडबुड करणारी (आणि हिन्दी चित्रपटांत बहुधा हटकून भेटणारी) श्रीमंतांघरच्या नोकर-मोलकरणींची जोडी प्रस्तुत नाटकात राघू आणि कोयना यांच्या रूपाने अवतीर्ण झाली असून, प्रत्यक्ष रंगभूमीवर न घडणारे प्रसंग प्रेक्षकांच्या सोयीसाठी निवेदन करणें (आणि अशा घटनाच अधिक आहेत) हें त्यांचें काम दिसतें. याव्यतिरिक्त कथानकाशीं त्यांचा संबंध लागत नाही.

नाटकांतील भाषा ही ग्रामीण बोली नी पुस्तकी रूपें यांच्या विचित्र मिश्रणाने वातावरणास परिपोषक वाटत नाही.

प्रस्तुत नाटकाच्या प्रतींत एका अभिनव स्पर्धेची प्रकाशकांनी जाहिरात केलेली आहे तिचा शेवटीं उल्लेख करावासा वाटतो.

" लेखकाच्या परवानगीने या नाटकाचा प्रयोग करणाऱ्यांनी त्या प्रयोगांतील उत्कृष्ट प्रसंगाचें एक छायाचित्र प्रकाशकाकडे पाठविल्यास नाटकाच्या दुसऱ्या आवृत्तींत लॉट टाकून या छायाचित्रांतून निवडून एक छायाचित्र प्रसिद्ध केलें जाईल. " हीच ती स्पर्धा. संबंधितांनी ध्यान द्यावें ! ● ● ●

भगवन्त देशमुख

## कल्पफुलें

नांवावरूनच प्रस्तुत पुस्तक हें कवितांचें आहे हें समजून येतें इतकें या पुस्तकाचें नांव अर्थपूर्ण आहे. मिरज-सांगली-कोल्हापूर या परिसरांतील कवींच्या कवितांचा प्रातिनिधिक संग्रह या पुस्तकांत केलेला आहे. ४१ कवींच्या कवितांचा संग्रह मिरज येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाच्या ४१ व्या अधिवेशनाच्या वेळीं प्रसिद्ध झाला ही एक औचित्यपूर्ण अशीच घटना होय. साहित्य संमेलनाच्या मंडपांत प्रवेश करतांना रिक्त हस्ताने न येतां या सर्व कवींनी शारदेला वाहण्यासाठी आपापल्या कवितांचीं ' कल्पफुलें, येतांना आणलीं ही घटना जितकी औचित्यपूर्ण तितकीच ती वैशिष्ट्यपूर्णहि समजली पाहिजे. या घटनेचें संयोजन सांगली येथील उत्साही शिक्षक कवि, लेखक व साहित्यिक कार्यकर्ते श्री. भा. ल. रानडे यांनी सहकार प्रकाशनाच्या वतीने केलेलें आहे याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

सहकार प्रकाशनाची योजना प्रामुख्येकरून जरी होतकरू कवि व लेखकांच्या कलाकृतींना प्रोत्साहन देणें ही असली तरी प्रस्तुत संग्रहांतील सर्वच कवि नवखे अगर होतकरू आहेत

कल्पफुलें–( प्रातिनिधिक कवितांचा संग्रह ) [ संपादक : श्री. भा. ल. रानडे, बी. ए. ( ऑनर्स ); सहकार प्रकाशन, सांभारे रस्ता, सांगली. मूल्य २ रुपये. ]

असें नाहीं. त्यांच्या कविता महाराष्ट्रांतील अनेक नियतकालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या असल्यामुळे जे मराठी वाचकांना सुपरिचित आहेत अशा म. भि. कुलकर्णी, रंगराव मुगळी, कासेगांवकर, मुजुमदार, विष्णुसुत उंब्रजकर, भा. ल. रानडे इत्यादि कवींच्या कविताहि प्रस्तुत संग्रहांत समाविष्ट करण्यांत आल्या आहेत. या कवींच्या जोडीला आणखी इतरहि अप्रसिद्ध व कमी प्रसिद्ध असलेले कवि या संग्रहांत प्रकट झालेले आहेत. संग्रहाला श्रीमती शान्ता शेळके यांची प्रस्तावना असून हा संग्रह मिरज (ज्यू.) च्या रसिक व वाङ्मयप्रेमी राणीसाहेब सौ. लीलाराजे पटवर्धन यांना समर्पण करण्यांत आला आहे.

या संग्रहांतील बरेचसे कवि नवीन अद्धून आत्माविष्कार करण्यासाठी धडपडत असलेले त्यांच्या कवितांवरून दिसून येतात. त्यामुळे वृत्तवाचव्याबरोबरच विषयवैचित्र्यहि प्रस्तुत पुस्तकांत आढळून आलें तरी ढिसूळ अगर विस्कळीत अशी शब्दरचना व वृत्तदोष यांमुळे बऱ्याचशा कवींचा नवखेपणा वाचकाला जाणवल्याशिवाय राहत नाही. रचना सफाईदार अगर सौष्ठवपूर्ण असती तर वर्णनपर कविताहि वाचतांना आल्हाददायक झाल्या असत्या. मात्र या नवीन कवींतहि श्री. श्या. कृ. कुलकर्णी (मैफल सरल्यावर, आषाढांतील), शान्ताराम कुलकर्णी (नको गीत तें), प्रभाकर इनामदार (लाल रिबिन, आठवतो का तुला किनारा), गीताकिशोर (साडी तुझी गुलाबी), श्री. ना. देशपांडे (काय हवे तुज) वगैरे कवींना चांगला भविष्यकाल आहे असें त्यांच्या कविता वाचून वाचकांचा ग्रह झाल्याशिवाय राहणार नाही. मिरज साहित्य संमेलनाच्या निमित्ताने सांगली-मिरजेच्या परिसरांतील सर्व जुन्या-नव्या कवींना एकत्र आणण्याची ही योजना स्तुत्य असून संपादक अभिनन्दनास पात्र आहेत. ● ● ●

वा. रा. ढवळे

अनुक्रमणिका

## पत्रव्यवहार

### डॉ. म. म. पां. वा. काणे

#### शकार्थावर अभिनव प्रकाश

सा. न. वि. वि. साहित्यपत्रिकेच्या वर्ष ३३ अंक १२९ यांत प्रा. शेंबवणेकर यांनी 'शकार्थावर अभिनव प्रकाश' ह्या नांवाचा लेख प्रसिद्ध केला. त्यावर डॉ० वा. वि. मिराशी यांनी अंक १३० मध्ये (पृष्ठें २४—२७) उत्तर दिलें आहे. मी दोन्ही लेख वाचले होते. प्रा. शेंबवणेकर यांच्या लेखाकडे लक्ष देण्यासारखा तो नाही असें मत झालें. अलीकडे प्रा. शेंबवणेकर यांनी आपल्या लेखाची छापील प्रत माझ्याकडे भेट म्हणून पाठविली. तेव्हा त्यांना मी तो लेख वाचून अभिप्राय द्यावा अशी इच्छा दिसली म्हणून त्यांचा पत्ता माहीत नसल्याने त्यांना न लिहितां पत्रिकेंत छापावा म्हणून आपल्याकडे पाठवीत आहें.

प्रा. शेंबवणेकर यांचें संशोधनात्मक लिखाण एकांगी असतें व पूर्वीच्या विद्वानांनी चुका केल्या, आपण कांहीतरी नवीन सांगत आहों अशा थाटाचें असतें असें कष्टाने म्हणावें लागतें. प्रस्तुत लेख त्याच मासल्याचा आहे. ब्रह्मसिद्धान्त किंवा ब्राह्मस्फुटसिद्धान्त (ब्रह्मगुप्ताचा) हा प्रथम बनारस येथे 'पण्डित' या नियतकालिकांत प्रसिद्ध झाला. नंतर त्याची १९०२ मध्ये बनारसमध्ये पुस्तकरूपाने आवृत्ति (म. म. सुधाकर द्विवेदी यांच्या टीकेसह) प्रसिद्ध झाली. तथापि ती प्रा. शेंबवणेकर यांनी पाहिलेली दिसत नाही; त्यांनी युनिव्हर्सिटी लायब्ररींतील हस्तलिखितावरच काम भागवून घेतलें आहे. युनिव्हर्सिटींत हस्तलिखितांचा कॅटलॉग् आहे त्याचा उल्लेख नाही. फक्त (ब्र. सि. folio No.2, 10) असा त्रोटक उल्लेख केला आहे. युनिव्हर्सिटींत जाऊन पाहतां ब्रह्मसिद्धान्त नांवाच्या दोन पोथ्या निघाल्या. त्यांतील एकींतच ब्राह्मस्फुटसिद्धान्त आहे. १० हा आंकडा कशाचा हें एक गूढच आहे. तो श्लोक १०वा नाही किंवा १० व्या ओळींतहि नाही; असो. प्रथमाध्यायांत २६ वा श्लोक (आर्या) असा आहे—कल्पपरार्धे मनवः षट् कल्य गताश्चतुर्युगत्रिघनाः । त्रीणि कृतादीनि कलेर्गोऽगैकगुणाः ३१७९ शकान्तेऽब्दाः ॥ थोडक्यांत अर्थ—क म्हणजे ब्रह्मा याची द्वितीयपरार्धात सहा मनु, सत्तावीस चतुर्युगें (त्रि या संख्येचा घन २७), (२८ व्या चतुर्युगांतील) कृतत्रेताद्वापर हीं तीन युगें व (चवथ्या) कलियुगांतील ३१७९ वर्षें (अब्दाः) शकाच्या (म्हणजे शकनृपाच्या) अंतीं झालीं. असा सरळ अर्थ आहे. येथे ब्रह्मदेवाच्या आयुष्याची कालगणना आहे.

सबंध ग्रंथ पाहिल्याशिवाय कांही लिहूं नये असा दासबोधांत बोध आहे असें स्मरतें, तो या ठिकाणीं उत्तम लागू पडतो. प्राध्यापकांनी दिलेल्या 'त्रीणि शतादीनि' या शब्दाचा अर्थच कांही होत नाही. छापील पाठ 'त्रीणि कृतादीनि' हाच बरोबर आहे व त्याने अर्थ चांगला लागतो. प्राध्यापकांनी जो श्लोकाचा तुकडा दिला आहे त्याचे पुढचे श्लोकहि त्यांनी पाहण्याची तसदी घेतली नाही किंवा ग्रंथाच्या शेवटीं ग्रंथकाराने आपला काळ दिला आहे तोहि त्यांनी पाहिला नाही. दीक्षितांसारख्या महाविद्वानाच्याहि नजरेंतून सुटलेली गोष्ट आपण प्रकाशांत आणीत आहों अशा प्रमोदभरांत त्यांनी लिखाण केलें. ज्या २६ व्या श्लोकाचा एक तुकडा (व तोही चुकीच्या पाठाचा) वाचकांच्या तोंडावर टाकला आहे, त्याच्यापुढेच खालील श्लोक (आर्या) आहे.— नवनगशशिमुनिकृतनव-

यमनगनन्देन्दव:'[1] १९७२९४७१७९ शक**नृपान्ते** । सार्धमतीतमनूनां सन्धिभिराद्यन्तरान्तगतैः ॥ या श्लोकांत शकनृपाच्या अंतीं सहामनु त्यांचे संधि वगैरे मिळून किती वर्षें झालीं तीं सांगितलीं आहेत. या दोन्ही आर्यांत 'शकान्ते' व 'शकनृपान्ते' हे शब्द एकाच अर्थाने योजले आहेत हें स्पष्ट आहे. पहिल्या आर्येत किती मनु, किती चतुर्युगें व शिवाय कृतादि तीनयुगें आणि कलीचीं वर्षें सांगितलीं; दुसऱ्या आर्यत एकंदर वर्षांची संख्या दिली इतकाच फरक. आता ब्राह्मस्फुटसिद्धान्ताच्या शेवटीं २४ व्या अध्यायांत (संज्ञाध्यायांत) श्लोक ७।८ असे आहेत. श्रीचापवंशतिलके श्रीव्याघ्रमुखे नृपे शक**नृपाणाम्** । पञ्चाशत्संयुक्तैर्वर्षशतैः पञ्चभिरतीतैः ॥ ब्राह्मस्फुटसिद्धान्तः सज्जनगणितज्ञगोलवित्प्रीत्यै । त्रिंशद्वर्षेण कृतो जिष्णुसुतब्रह्मगुप्तेन ॥ चापवंशतिलक (चावडा ?) व्याघ्रमुख राजा असतां तीस वर्षें वयाच्या जिष्णुपुत्र ब्रह्मगुप्ताने ब्राह्मस्फुटसिद्धान्त नांवाचा ग्रन्थ शकनृपांचीं ५५० वर्षें गत झालीं असतां केला. यावरूनहि ब्रह्मगुप्तासारख्या प्राचीन (जन्मशक ५२० सन ५९८) ग्रंथकाराला शक म्हणजे शकनृपांशीं निगडित शककाळच अभिप्रेत आहे हें स्पष्ट दिसतें. शक शब्दाशीं युधिष्ठिराचा संबंध नाहीं; हेंहि या ग्रंथावरून सिद्ध होतें. भास्कराचार्यांच्या सिद्धान्तशिरोमणि या ग्रंथांतहि ब्राह्मस्फुटसिद्धान्तांतील २६ व्या श्लोकाप्रमाणेच 'याताः षण्मनवो युगानि भीमतान्यन्यद्युगाङ्घ्रित्रयं नन्दाद्रीन्दुगुणास्तथा **शकनृपस्यान्ते** कलेर्वत्सराः ।' (१।२८) फक्त 'शकान्ते' बद्दल 'शकनृपस्यान्ते' इतका शब्द आहे, बाकी सर्व मोजणी ब्रह्मसिद्धान्ताप्रमाणेच आहे. शक शब्दाचा शकराजा असाहि अर्थ होतो असें 'ते तद्राजाः,' 'कम्बोजाल्लुक्' हीं दोन पाणिनिसूत्रें (४-१-१७४, १७५) व वार्तिक 'कम्बोजादिभ्यो लुग्वचनं चोलाद्यर्थम्' यावरून सिद्ध होतें. कम्बोज, चोल, केरल, शक व यवन असे पांच शब्द कम्बोजादिगणांत आहेत. त्या प्रत्येकाचा 'राजा' असाहि अर्थ होतो.

प्रा. शेंबवणेकरांनी लेखांत दुसऱ्या अवांतर गोष्टींचा खल केला आहे त्याचा परामर्श घेण्याची जरुरी नाही. मुद्याची गोष्ट त्यांनी ब्रह्मसिद्धान्तांतील १-२६ श्लोकाचा भलताच अर्थ केला आहे इतकीच. प्राध्यापकांनी अभिनव प्रकाश पाडला आहे की अभिनव अन्धकारांत ते चाचपडत आहेत याचा विद्वानांनी व वाचकांनी विचार करावा.

आंग्रेवाडी }
मुंबई ४. }

आपला,
**पां. वा. काणे**

---

१ चार युगांचीं ४३२०००० वर्षें, ७१ चतुर्युगांचा एक मनु, असे सहा मनु, त्यांचे सन्ध्यंश व कृतत्रेताद्वापर तीन युगें व कलियुगाचीं ३१७९ वर्षें मिळून वरील संख्या होते. चौदा मनूंचा कल्प होतो. म्हणून २६ व्या श्लोकांत कल्पपरार्धें मनवः षट् वगैरे सांगितलें.

प्रा. वा. ल. कुळकर्णी ( मराठी विभाग प्रमुख, मराठवाडा विद्यापीठ ), प्रा. म. श्री. पंडित ( रीडर, नागपूर विद्यापीठ ) व प्रा. भगवन्त देशमुख ( अध्यक्ष, उस्मानाबाद जि. सा. संमेलन तुळजापूर ) यांचे, कंसांत दर्शविलेल्या मान-नियुक्तीबद्दल अभिनन्दन करण्यांत आलें. ७ संयुक्त महाराष्ट्राची स्थापना होत आहे याबद्दल का. का. मंडळाने समाधान व्यक्त केलें; तथापि सीमेवरील बहुसंख्य मराठी भाषिकांचा सलग प्रदेश अन्य राज्यांत घातला जाऊं नये व नव्या मराठी राज्याचें नांव ' महाराष्ट्र ' हेंच असावें याबद्दल आग्रहाची मागणी केली.

इतर:—अखिल भारतीय श्रमिक पत्रकार फेडरेशनचे अधिवेशन म. सा. परिषदेच्या सभागृहांत भरले असतां ( दि. २५ आक्टोबर ) तिचे अध्यक्ष श्रीजगदीश चतुर्वेदी यांना परिषदेतर्फे पुष्पहार घालण्यांत आला. मराठी नाट्य परिषदेतर्फे कै. चिंतामणराव कोल्हटकर व पार्श्वनाथ अळतेकर यांच्याविषयीं २५ नोव्हेंबरला दुखवटा सभा भरली होती. तींत परिषदेतर्फे श्री. मो. रा. वाळंबे यांनी भाषण करून दोघांना आदरांजलि वाहिली. उस्मानाबाद येथील जिल्हा साहित्य संमेलनाच्या तुळजापूर अधिवेशन प्रसंगी ( ता. २७–२८ डिसेंबर ) कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर उपस्थित होते. संमेलनाचे उद्घाटन त्यांचे हस्तेंच झालें.

---

## नवीन सभासद

**तहहयात**

१. प्रा. डॉ. म. मा. अळतेकर, मुंबई १६.
२. डॉ. ना. गो. कालेलकर, पुणें ६.
३. प्रा. ग. शं. चुणेकर, वाराणसी.

**साधारण**

१. श्री. मंदाकिनी ल. दाते, पुणें.
२. श्री. न. गो. अभ्यंकर, पुणें.
३. श्री. स. आ. जोगळेकर, पुणें.
४. कुंदा जगदाळे, कसबे तडवळे सोलापूर).
५. श्री. ल. दे. सुर्वे, अक्कलकोट.
६. श्री. भा. स. देशपांडे, कल्याण.
७. प्रा. डॉ. उषा पोतदार, कोल्हापूर.
८. प्रा. इंदू टिकेकर, कोल्हापूर.
९. श्री. दा श्री. जोशी, नागपूर.
१०. श्री.भा.रा.कुलकर्णी,मुरूम(उस्मानाबाद).
११. श्री. श्रा. बु. सावळे, पारोळा.
१२. श्री द. वि. देवधर, पुणें.
१३. श्री. श्री. रा. देव, धाराशिव.
१४. प्रा. ग. वा. कवीश्वर, इंदूर.

---

मुद्रक :– म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १५७५/२ सदाशिव, पुणें २.
प्रकाशक :– य. दि. पेंढरकर, कार्याध्यक्ष, महाराष्ट्र–साहित्य–परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| १ | मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभावअखेर )<br>ले. कै. बा. अ. भिडे | ( प्रती शिल्लक नाहीत. ) |
| २ | म. सा. परिषद्-इतिहास<br>ले. द. वा. पोतदार | रु.न.पै.<br>३=०० |
| ३ | संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति<br>ले. गं. बा. सरदार | २=०० |
| ४ | वाङ्मय समालोचन ( १९४७ ) | २=०० |
| ५ | वाङ्मयीन वाद ( पुरस्कृत ) | ३=०० |
| ६ | निबंध-विकास ( प्राज्ञ परिक्षेस लावलेलें ) | २=५० |
| ७ | साहित्य सुगंध ( प्रवेश ,, ,, ) | २=५० |
| ८ | सारस्वत प्रवेश ( प्रथमा ,, ,, ) | २=०० |
| ९ | शुद्धलेखन नियम ( १९५९-नवी आवृत्ति ) | ०=१५ |

( क्र. ३ व ५ या पुस्तकांची मागणी अनुक्रमें व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; व प्रसाद प्रकाशन, सदाशिव पुणें २ यांचेकडे करावी. )

इतर चौकशी:-चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, पुणें २.